कीर्ति झाली व जनमनांत त्यांनीं पूर्वींच्या धर्म-संस्थापकांइतकेंच खोल स्थान मिळविलें याचें कारण तरी हेंच होय. कोट्यवधि स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील विवेकदीप अधिक प्रज्वलित करावा म्हणजेच त्यांना सज्जन व शीलवान् करून सोडावें व त्यांच्यांत समता प्रस्थापित करावी, हें त्यांच्या जीवनाचें लक्ष्य होतें. परम-सत्याची जिज्ञासा आणि विश्वव्यापी प्रेम हीं जीं संतांचीं दोन मुख्य लक्षणें तीं त्यांच्या ठिकाणीं अशा रीतीनें प्रकट झालीं होतीं.

आत्मोद्धाराशिवाय दुसऱ्यांचा उद्धार करतां येत नाहीं, हें संतांच्या क्रियापंथाचें सूत्र असतें. जो आत्मबंधु होतो तोच विश्वबंधु होऊं शकतो; म्हणून आत्मशुद्धि हा गांधीजींच्या सत्याग्रह-चळवळीचा प्राण होता. पण गांधीजी व पूर्वीं होऊन गेलेले संत यांच्यामध्यें हा मोठा फरक होता कीं, सामाजिक सुखदुःखांची जबाबदारी समाजांतील सर्व माणसांची मिळून आहे व माणसाला सज्जन किंवा साधु बनवावयाचें असेल तर सामाजिक संस्थांत तसा अनुकूल बदल घडवून आणणें जरूर आहे व मानवी प्रयत्नांनीं तो तसा होतो असें गांधीजी मानीत. अशी त्यांची श्रद्धा होती म्हणूनच समाजकारण, राजकारण, अर्थकारण वगैरे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत धर्माची व नीतीची स्थापना झाली पाहिजे असा आग्रह त्यांनीं सदा धरला.

लोकशाही समाज व राज्यपद्धति यांचा मुख्य आधार प्रत्येक व्यक्तीबद्दल आदर व श्रद्धा आणि जीवनांतील सर्व क्षेत्रांत समता हा आहे. सज्जनतेशिवाय लोकशाही सुस्थिर होणें शक्य नाहीं. ‘सर्वां भूतीं पाहे तोचि वासुदेव’ या तत्त्वाचा साक्षात्कार झाल्याशिवाय व या मंगलमय तत्त्वाची आराधना केल्याशिवाय आजच्या जगांत सज्जनतेची व समतेची स्थापना कशी होणार ?

---

प्रा. देवदत्त दाभोलकर

# हे महान् जीवन-कलाकार !

“......जगांत आजवर जे अनेक महाकवी होऊन गेले त्यांत अग्रपूजेचा मान तुलाच द्यावा लागेल. तुझं जीवन म्हणजे एक महाकाव्य होतं. तुझ्या जीवनाविषयीं विचार करूं लागलं कीं वाटतं, तुझा पिंड हा खरा कलावन्ताचा होता. सहानुभूति, सहानुभव हा तर कलेचा आत्मा. आणि धडपडणाऱ्या, अडखळणाऱ्या मानवी जीवनाविषयींची सहानुभूति तुझ्या अंतःकरणांतून भरभरून ओसंडून वाहत होती. ‘अखिल मानवतेची वेदना ही माझी वेदना आहे’ ही कलावन्ताची भूमिका तूं आपल्या जीवनांत स्वभावधर्माच्या सहजतेनं सांभाळली होतीस. इतर लोकांच्या मंदिरांत देवाला जें स्थान असतं तें तुझ्या जीवनांत तूं दलित मानवाला दिलंस. जाति, धर्म, वंश या अशा सर्व संकुचित भेदांच्या पलीकडे जाऊन मानवांतील एकता पाहावयास तूं आम्हांला शिकविलंस.

“तुझ्या जीवनांत तरी केवढं रोमहर्षक करुणनाट्य भरलेलं आहे ! जगांतील साऱ्या अशांततेची जबाबदारी एका व्यक्तीनं आपल्या खांद्यावर तोलण्याचा प्रयत्न करावा, ही कल्पना देखील केवढी भव्योदात्त आहे ! तुझ्याविषयीं अनेकांच्या मनांत अनेक संदेह होते व राहतील. परंतु तुझ्या स्मरणानं ज्याला स्वतःच्या अंतरांतील मरणारी माणुसकी पुन्हां संजीवित होत आहे असं कांहीं क्षणहि वाटत नसेल असा माणूस—छे,त्याला माणूस म्हणणं हा मानवतेचाच अपमान होईल !

“तुझं जीवन म्हणजे एक वासंतिक गीत होतं. या वसंताच्या अखेरीसच वर्षा-ऋतूच्या वादळानं सारं आकाश भरून आलं आणि कडाडणाऱ्या विजेनं कर्वतलेल्या अंधारांत मानवता पुन्हां चांचपडूं लागली. यदुनंदनाचा वेणुरव कानीं यावा आणि सारें चराचर गोकुळ उत्कंठित होऊन थराරून उभं राहावं त्याप्रमाणं तुझी साद ऐकूं येतांच जडांनाहि चेतना मिळे, दुष्टांचेहि सद्भाव जागृत





अनुक्रमणिका

होत आणि मृतप्राय जीवन जगणाऱ्यांच्याहि मनांत जीवनाचं सार्थक होईल असं कांहीं करावं अशी अनिवार उर्मि उचंबळून येई. कोट्यवधि लोकांनीं मुग्ध होऊन ऐकावं अशी जादू तुझ्या वाणींत भरून राहिली होती !

"खरा व्यक्तिवादी आजवर तुझ्याखेरीज दुसरा कोणी झाला नाहीं. प्रत्येक व्यक्तीचा आत्मा कसा सुरक्षित राहील हीच तुझी एक तळमळ होती. रामराज्याची स्थापना तुला व्यक्तीव्यक्तीच्या जीवनांतून करावयाची होती. यासाठीं अनेक मोह टाळावे लागतील, शिष्टाचाराच्या अनेक नकली संस्कारांना रजा द्यावी लागेल, हें तुझ्याइतकं आजवर दुसऱ्या कोणींच ओळखलं नव्हतं. 'माझा आत्मा हा माझाच आहे' असं निर्भर विश्वासानं आपल्यापैकीं खरोखर किती जणांना म्हणतां येईल ? तत्त्वज्ञ इमर्सन म्हणत असे कीं, सर्वस्वीं स्वतःच्या प्रेरणेनं—आत्मप्रेरणेनं केलेली कृति ही जगांत एक अत्यंत दुर्मिळ चीज आहे. खरोखर, इमर्सनच्या या वचनांत केवढं सत्य भरून राहिलेलं आहे ! आपल्यापैकीं बहुतेक साऱ्यांच्या कृती या इतरांच्या कृतींच्या प्रतिकृती असतात. कोणाचं तरी मत आपण आपलं मत म्हणून सांगतों; आपल्या वागणुकींत कोणाचं तरी विपरीत अंधानुकरण करतों. अवतरणचिन्हांच्या आधाराखेरीज आपला स्वतंत्र असा कोणताच विचार आपल्या मनांत कधीं तयार होत नाहीं. परंतु गाउलट या सर्व मर्यादांच्या पार जाण्याचं सामर्थ्य तुझ्या प्रतिभेंत होतं ! व्यक्तिविकासाचं हें खरं मर्म आजवर एकट्या तुलाच आकलन झालेलं दिसलं.

"केवळ कारुण्यासाठीं म्हणून कधीं तूं करुणरस आळवीत बसला नाहींस. सर्व दलितांविषयींचं कारुण्य तुझ्या अंतरांत ओतप्रोत भरून राहिलेलं असे. परंतु सुखासीन, सुखवादी धनवन्तांच्या विषयींहि तितकीच करुणा तुझ्या अन्तःकरणांत वसत होती. भौतिक सुखांचे गुलाम होऊन राहिलेल्या या लोकांची तुला कींव येई. सुखलोलुपता वाढविणारी श्रीमंती हा दारिद्र्याहूनहि एक अधिक मोठा शाप आहे असं तुला वाटे. करुणेसाठीं करुणा असं तुझं साधं ध्येय नव्हतं. 'आपल्या शत्रूवर प्रेम करा' असं सांगतांना शत्रूवर करावयाच्या उपकारांपेक्षांहि आपल्या अन्तःकरणाच्या विकासाचा हेतु तुझ्यापुढं अधिक प्रामुख्यानं असे. 'आपलं सर्वस्व दलितांना देऊन टाका' असं सांगतांना दलितांच्या दुःखनिवारणापेक्षांहि दात्यांच्या आत्मिक उन्नतीची चिन्ता तुला अधिक असे. 'दुसऱ्यासाठीं आपलं जीवन अर्पण करा' असं सांगण्याऐवजीं, अखेर साऱ्या मानवतेचं जीवन हें एकच आहे हें मूलभूत तत्त्वज्ञान तूं आम्हांला शिकविलंस.

"आणि या एकतेची जाणीव होणं हेंच कोणत्याहि उदात्त कलेचं प्रेरणास्थान आहे. या दृष्टीनं तूं कलावन्तांचाहि कलावन्त होतास. मानवतेच्या अनेक मूक दुःखांना वाचा फोडण्याचं काम कलावन्त करीत असतो. परंतु कलेचा सुकुमार स्पर्शहि ज्यांना सहन होऊं शकत नाहीं अशीं कांहीं जिव्हारीचीं दुःखं अखेर उरतातच. या मानवतेच्या दुःखांना एखादा सहृदय जीवनकलाकारच हात घालूं शकतो. हें असामान्य कलासामर्थ्य, हे महान् जीवनकलाकार, तुझ्या करस्पर्शांत आम्हांला जाणवलं होतं."

[ सुप्रसिद्ध आंग्ल साहित्यिक ऑस्कर वाइल्ड (१८५४-१९००) कीर्तीच्या शिखरावर असतांना त्याला अनैतिक वर्तनासाठीं तुरुंगांत जावं लागलं. जन्माची प्रतिष्ठा एका क्षणांत धुळीला मिळाली. समाजांत त्याला कोणतंहि स्थान उरलं नाहीं. त्याचं नांव हें एक उपहासाचा, कुचेष्टेचा विषय होऊन बसलं. याच तुरुंगवासाच्या कालांत 'De Profundis' ('out of the depths') अनुतापाच्या अग्नींतून उजळून निघालेल्या एका अत्यंत बुद्धिमान् व सहृदय कलावन्ताच्या अन्तःकरणाचं मनोज्ञ दर्शन या आत्मकथेंत आपल्याला होतें. येशू ख्रिस्ताच्या जीवनाचें अत्यंत सुंदर विश्लेषण या आत्मकथेंत निवेदनाच्या ओघांत ऑस्कर वाइल्डनें केलें आहे. त्यावरूनच वरील भाग मुक्तपणें संकलित केला आहे. ऑस्कर वाइल्डनें येशू ख्रिस्ताविषयीं काढलेले हे उद्गार गांधीजींच्या जीवनालाहि समर्पक रीतीनें लागू होतात या गोष्टीचें, हें संकलन करतांना, मला विशेष आकर्षण वाटलें.—लेखक ]







भूदान-यात्रेच्या निमित्तानें कांहीं विचार : श्री. प्रेमा कंटक

# खडक कीं प्रतिमा ?

' महाराष्ट्राचा खडक फुटणें कठीण म्हणतां ? पण तो खडक नाहींच आहे ! ती एक ईश्वरप्रतिमा आहे. फोडायचा सवालच नाहीं. पूजा करायची आहे ! " —श्री. विनोबाजी ( एका पत्रांतून )

१ ऑगस्ट १९५२ ते १५ ऑगस्ट १९५२ पर्यंत पुरंदर तालुक्यांत श्री. शंकरराव देव यांच्याबरोबर भूदान-यात्रेंत फिरत असतांना श्री. 'विनोबाजींना मीं आपला अनुभव एक पत्र पाठवून एका वाक्यांत कळविला होता. त्यावर त्यांचें वरील भाष्य आलें !

**तप, यज्ञ आणि दान**

गीतेंत तप, यज्ञ आणि दान यांचें फार मोठें महत्त्व वर्णन केलें आहे. या तिहींवरच सामाजिक जीवनाचा पाया उभारलेला आहे. प्रत्येक व्यक्तीला हीं तीन कर्तव्यें अवश्य आहेत. पैकीं दान व यज्ञ हीं तर सामाजिक तत्त्वेंच आहेत. तप मात्र वैयक्तिक होऊं शकतें.

भूदान-यात्रेंत वरील तीनहि.तत्त्वें ओतप्रोत आहेत. एक महान् कार्य हातीं घेऊन तें पार पाडण्यासाठीं विचारणा करणें, त्यासाठीं लागणारीं साधनें व सहायक गोळा करणें, योजना करणें व ती अंमलांत आणणें व हें सर्व करीत असतांना आपल्या शरीरास व मनास होणारे कष्ट विसरून, ध्येयावरच एकाग्र आणि एकनिष्ठ बनणें यालाच तप म्हणतात. हें तप समाजाच्या कल्याणासाठीं आचरिलें म्हणजे तो यज्ञ झाला. समाजाच्या सहकारांतून संपत्ति मिळविली तर तिची धर्म्य वांटणी करणें या गोष्टीला दान म्हणतात.

समाजांतील प्रत्येक व्यक्तीला पुरुषार्थाची हांव असतेच. त्या पुरुषार्थाचें फलहि त्याला स्वत:लाच हवें असतें. परंतु मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. समाजाशिवाय त्याला जगणें किंवा आपला विकास करून घेणें शक्य नसतें. त्यामुळें त्यानें कितीहि पुरुषार्थ केला, तरी तो समाजाच्या मदतीशिवाय झालेला नसतो. म्हणूनच सामाजिक कर्तव्य पार पाडल्यावर पुरुषार्थाचें जें कांहीं फल शेष राहिलें असेल तें भोगण्याचा हक्क मनुष्याला शास्त्रानें बहाल केला आहे. सामाजिक कल्याण व व्यक्ति-स्वातंत्र्य यांचा समन्वय धर्म करून देत असतो.

परंतु सामान्य अनुभव असा आहे कीं, मनुष्याला समाजापासून फायदे हवे असतात, पण आपला लोभ व मद सोडून तो समाजाशीं ऐक्य साधूं इच्छीत नसतो. आत्मविकासाऐवजीं ऐश्वर्यविकासाची हांवच त्याला अनिवार असते. याचा परिणाम म्हणजे सामाजिक विषमता, अन्याय व अधर्म !

महात्मा गांधींनीं या देशांतील परकीय सत्तेशीं सत्याग्रहाच्या बळावर झुंज खेळून देश स्वतंत्र केला व ते निजधामास गेले. राजकीय स्वातंत्र्य आलें परंतु अद्याप खऱ्या अर्थानें लोकशाही प्रस्थापित झालेली नाहीं. सामाजिक व आर्थिक समताहि अद्याप फार दूर आहे. गांधींचें अपुरें राहिलेलें कार्य त्यांच्या अनुयायांनीं आतां पुरें करणें कर्तव्यप्राप्त आहे.

स्वामी विवेकानंदांनीं एकदां म्हटलें होतें : ' The Nation lives in the cottage. ' हें खरें असेल तर भारताच्या लाखों खेड्यांतील लोकांनीं आदर्श राज्यव्यवस्था व समाजव्यवस्था मान्य केल्याशिवाय राष्ट्रांत अमुक एक ' शाही ' स्थापन झाली आहे, हें म्हणणें वस्तुस्थितीस धरून असणार नाहीं.लोकसंख्येचा मोठा भाग आज शेतीवर गुजराण करीत आहे. हिंदुस्थानांत पाश्चात्य पद्धतीनें औद्योगीकरण झपाट्यानें आणण्याचा अनेक हिंदी राज्यधुरीणांचा प्रयत्न आहे. परंतु अद्याप तरी औद्योगीकरण मागसलेलेंच आहे. लोकांचा जीवना-धार जी शेती ती निकृष्ट अवस्थेंत.आहे. तरी देखील मालक थोडे, राबणारे असंख्य आणि राबणाऱ्यांच्या








पदरीं फळ अल्प. बेकारी अफाट व दिवसेंदिवस वाढणारी. संस्कृतीचें आधुनिक साधन शिक्षण आणि तेंहि महाग. दीर्घायुष्याची गुरुकिल्ली आरोग्य आणि ती तर हरवलेली ! अशा विषम परिस्थितींत समाज आज वैक्लव्य भोगीत आहे !

सामाजिक ऐक्य साधण्यासाठीं समाजांतील व्यक्तीव्यक्तींमध्यें शुद्ध व संपूर्ण सहकार हवा. एकोपा असलेल्या कुटुंबांत शुद्ध व संपूर्ण सहकार असतो असें जेव्हां म्हटलें जातें तेव्हां त्याचें मुख्य लक्षण हें असतें कीं, कुटुंबांतील सर्वच घटकांना कुटुंबांत सारखें प्रेम, समान वागणूक व सोयी मिळत असतात. याचाच अर्थ, कोणा एका किंवा थोड्या व्यक्तींजवळ संपत्ति किंवा सोयी पुंजीभूत होत नसतात. घरांतील सर्व संपत्तीचा व वस्तूंचा उपभोग घेण्याचा हक्क व सवलत हीं प्रत्येक घटकास असतात. जें एका कुटुंबाच्या बाबतींत तेंच सर्व समाजाच्या बाबतींत लागूं आहे. आपल्या समाजांत अद्याप शुद्ध व संपूर्ण सहकार अस्तित्वांत आलेला नाहीं. खेड्यांना लुटून शहरें गबर झालीं आहेत. मजुरांना पिळून मालक गबर झाले आहेत: गिऱ्हाइकांना लुटून धंदेवाले, दुकानदार व व्यापारी अधिकाधिक संपत्तिमान् होत आहेत. प्रजेला लुटून सरकारी अधिकारी पुंजी करीत आहेत. ही परिस्थिति सुधारण्याची इच्छा प्रत्येक जण व्यक्त करीत आहे. पण वर सांगितल्याप्रमाणें यज्ञ व दान करण्याची वृत्ति मात्र फार थोड्यांत आहे.

### अहिंसक समाजरचनेची पूर्वतयारी

खेड्यांचें भयंकर नुकसान शहरांनीं केलें आहे तरी शहरें आपलें पाप ओळखणार नाहींत किंवा तें धुवून काढण्यासाठीं आत्महत्याहि करणार नाहींत ! बहुसंख्याक प्रजा खेड्यांत असल्यामुळें 'बहुजनहिताय, बहुजनसुखाय' खेड्यांत संचार करून तेथील प्रजेला जागृत करणें आजचें प्रथम कर्तव्य ठरतें. त्याचा साक्षात्कार झाल्यामुळें एरवीं वर्षानुवर्षें क्षेत्रसंन्यास घेऊन बसलेले श्री. विनोबाजी आज देशभर खेड्यापाड्यांतून पायी संचार करीत आहेत. त्यांच्या पाठीशीं समग्र सर्वोदयसमाजाची व सर्वसेवासंघाची संघटित शक्ति प्रभावीपणें असावी या हेतूनें श्री. शंकररावांनीं अखिल-भारतीय योजना आंखली व तिच्यांत चैतन्य ओतण्यासाठीं दर महिन्यांत एका प्रदेशांतून स्वत: पायीं हिंडून कामास चालना देण्याचें ठरविलें.

ते महाराष्ट्राचे रहिवासी असल्यामुळें व पुरंदर तालुक्यांत गेलीं अठरा वर्षें त्यांचा आश्रम सेवाकार्य करीत असल्यामुळें संचाराची सुरुवात तेथूनच व्हावी अशी योजना त्यांनीं ठरविली. महाराष्ट्राचे पूज्य व प्रिय नेते स्व. लोकमान्य टिळक यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं पहांटे ही यात्रा सासवडांतील आश्रमापासून सुरू झाली.

खेड्यांशीं माझा परिचय कमी नाहीं. सासवडांत आल्यापासून व महाराष्ट्र-कॉंग्रेस-स्त्रीसंघटना समिति आणि कस्तुरबा ट्रस्ट यांच्या विद्यमानें व्यापक प्रमाणावर सेवाकार्य सुरू झाल्यानंतरहि खेड्यांशीं माझा संबंध सतत येत गेला आहे. खेड्यांतून प्रचारकार्य, प्रत्यक्ष सेवा, संघटना आदि कामें इतकीं वर्षें चालू ठेवलीं. ही फक्त पूर्वतयारी होती. या सर्व सेवाकार्यांतून क्रांति फलित व्हावी व अहिंसक समाजाची स्थापना आपल्या या विशाल देशांत व्हावी अशी मनापासून इच्छा होती. महात्माजींशीं झालेल्या अखेरच्या भेटींत या अहिंसक समाजाच्या शीघ्र स्थापनेबाबत काय करतां येईल यासंबंधीं चर्चाहि झालेली आठवते. महात्माजींनीं मला आपली योजना लिहून स्वतःकडे देण्याची आज्ञा केली होती. पण त्यांच्या आकस्मिक मृत्यूमुळें तत्कालीन बेत तसेच राहिले !

पण शुभ कल्पना जन्मास आल्यानंतर कधींच मरत नाहींत. महात्माजींच्या एका श्रेष्ठ शिष्याला साक्षात्कार झाला व त्यानें भूदानयज्ञाच्या चळवळीस जन्म दिला. आमचें चिरवांच्छित स्वप्न प्रत्यक्षांत आणण्यासाठीं पराक्रमाची शर्थ करण्याची संधि आम्हांस मिळाली !

शंकरराव भूदानयज्ञ-यात्रेंत सर्वोदयाचा संदेश खेड्यांच्या कानाकोपऱ्यांत पोहोंचवूं इच्छीत होते. पण त्याबरोबरच त्यांच्याजवळ आणखीहि एक योजना होती. अहिंसक समाजाचें लहानसें का होईना, पण एखादें प्रात्यक्षिक या तालुक्यांत करून दाखवावें असें त्यांना वाटत होतें. अहिंसक समाजाचा बोलबाला हल्लीं बराच झाला आहे. पण










तो प्रत्यक्षांत आल्याशिवाय कोणाला त्याची कल्पना येणें अशक्य आहे. मानवाच्या इतिहासांत अशा समाजाची नोंद आतांपर्यंत नाहीं. अज्ञाताबाबत प्रयोग करण्याची हिंमतहि आज कोणांत नाहीं. समाजांत कोणी बेकार राहतां कामा नये, श्रम करून प्रत्येकानें आपलें पोट भरलें पाहिजे, श्रमांत सहकार असावा, पण पिळवणूक असूं नये, प्राथमिक गरजेच्या सर्व वस्तू शुद्ध स्वदेशी असाव्या, जात-पात-धर्म यांचा सामाजिक समतेस विरोध नसावा, अन्न, वस्त्र, निवास, आरोग्य व शिक्षण या सोयी सर्वांसाठीं असाव्या, संपत्तीचें केंद्रीकरण असूं नये, उत्पादनाचीं साधनें सर्वांच्या मालकीचीं असावीं, पंचायतीनें कारभार करावा अशी कांहीं स्थूल कल्पना या अहिंसक समाजाची देतां येईल.

पुरंदर तालुक्यांत प्रयोग करण्याच्या दृष्टीनें श्री. शंकररावांनीं तालुक्याची समग्र माहिती गोळा करण्याची व्यवस्था करविली. त्याप्रमाणें तालुक्यांतील खेडीं, लोकसंख्या, पिकें, पाणी, गुरें, लागवडीखालील जमीन, पडीत जमीन, उद्योगधंदे, कमावणाऱ्यांची संख्या, बेकारी, आश्रितांची संख्या इत्यादि निरनिराळ्या मुद्द्यांची माहिती गोळा होऊन त्यांच्याकडे येऊन पडली. प्रवासाची व्यवस्था झाली, सोबती मिळाले, प्रांताच्या सर्व दर्जाच्या थरांच्या व मतांच्या लोकांनीं त्यांना शुभेच्छा दिल्या व एका सुप्रभातीं त्यांनीं प्रयाण केलें.

### खेड्यांतील प्रश्न व उणीवा यांचें विराट् दर्शन

शंकररावांनीं खेड्यांचें दर्शन मधून मधून घेतलें होतें. परंतु त्यांचा खेड्यांशीं प्रत्यक्ष संबंध कधींच आला नव्हता. पायीं प्रवास करण्याचा हा त्यांचा नवाच अनुभव होता. कमिटींत बसून योजना करणें आणि ज्यांच्याकडून ती योजना प्रत्यक्षांत अंमलांत आणावयाची त्यांच्या गळीं ती उतरविणें यांत दोन ध्रुवांएवढें अंतर आहे! खेड्यांतील लोकांनीं शंकररावांबद्दल ऐकलें होतें. क्वचित् वर्तमानपत्रें वाचणाऱ्यांनीं त्यांचें नांव वाचलें होतें. त्यामुळें ही थोर व्यक्ति पायीं चालत आपल्या गांवीं आली आहे हें पाहून त्यांच्या अतिथिसत्काराच्या भावनेला भरतें आलें व बहुधा प्रत्येक खेड्यांत त्यांनीं त्यांचें वेशीवर स्वागत करून वाजतगाजत त्यांना गांवांत आणलें व आपल्या शक्तीप्रमाणें आदर-सत्कारहि चांगला केला. दोन-तीन गांवें सोडल्यास बहुसंख्याक ग्रामवासियांनीं त्यांच्या सभांना हजर राहून त्यांचीं व्याख्यानेंहि ऐकलीं. पण या पलीकडे फारशी हालचाल किंवा औत्सुक्य हीं मोठ्या प्रमाणांत तरी दिसून आलीं नाहींत.

जरी प्रत्येक खेड्यांत दिवसभर मुक्काम असे तरी ग्रामवासीयांशीं प्रत्यक्ष संबंध थोडाच येत असे हें कबूल केलें पाहिजे.

पहांटे ४–१५ वाजतां उठून प्रातर्विधि आटोपून सामान बांधून बैलगाडीवर चढवायचें. प्रार्थना करून ५॥ किंवा ५॥। ला संचारास सुरुवात होई. वाटाडे बरोबर नसल्यामुळें पुष्कळदां चक्कर खाऊन अधिक चालावें लागे. मुक्कामावर पोंचण्यास, जसें अंतर असेल त्या प्रमाणांत १०, ११ किंवा क्वचित् १२ वाजत. मुक्कामास पोंचल्यावर ग्रामवासियांचें मुखदर्शन होई व दिवसांतील कार्यक्रम निश्चित करण्यांत येई. नंतर स्नान, जेवण व आराम करून शंकरराव टपाल पुरें करीत. साधारणपणें अडीच-तीनच्या सुमारास सूत्रयज्ञ होई. कधीं मुक्कामावर तर कधीं सार्वजनिक जागीं. तेव्हां-पासून गांवांतील लोकांशीं संबंध येण्यास सुरुवात होई. सभा ६ वाजण्याच्या आंत आटोपली तर रात्रीं कार्यक्रम नसे. जर सायंकाळपर्यंत सभा झाली नाहीं, तर रात्रीं ९ ते ११ पर्यंत सभेचा कार्यक्रम असे. ११ वाजण्यापूर्वी झोंपावयास बहुधा मिळत नसे.

एवढ्या थोड्या समाजांत सर्वोदयाचा संदेश ऐकविणें व जमिनीची मागणी करणें यापलीकडे विशेष काम होऊं शकत नव्हतें. अहिंसक समाजाची स्थापना करणें झाल्यास प्रचारासाठीं अधिक स्थिर संचार व जास्त मुदतीचा मुक्काम करणें जरूर होतें. खेड्यांतील स्थिति प्रत्यक्ष पाहत असतां आणि विशेष म्हणजे ग्रामवासीयांकडून अमुक कार्यक्रम अंमलांत आणविण्याची अपेक्षा बाळगीत असतां, खेड्यांतील प्रश्न, उणीवा, मर्यादा आणि आपली कुवत यांचें विराट् दर्शन झालें !

आम्हीं ज्या चौदा खेड्यांना भेटी दिल्या, त्यां-पैकीं अर्ध्यापेक्षां अधिक गांवें अशीं होतीं कीं ज्यांतील निदान मुख्य मुख्य लोक आपला माल








विकण्याच्या किंवा अन्य निमित्तानें सासवड-पुण्याशीं संबंध ठेवणारे होते. बाहेरचें जग त्यांना अगदींच अज्ञात नव्हतें. खेडेगांवांतील लोक आपल्या मुख्यांच्या तोंडानें पाणी पिणारे असतात. निदान कांहीं नवीन गोष्ट करावयास त्यांना सांगितली म्हणजे "गांवाला विचारा. आम्ही गांवाबाहेर नाहीं" हें ठरीव सांच्याचें उत्तर ते देत असतात. याचा अर्थ ते ग्रामीण लोकशाहीला मान देतात असें नाही. श्री. अप्पासाहेब पटवर्धन म्हणतात त्याप्रमाणें लोकांना कळपाच्या वृत्ती (herd-feeling) नें चालण्याची संवय असते. मेंढराप्रमाणें लोक कळप करून राहतात. एका मेंढरानें दरींत उडी टाकली कीं सारीं मेंढरें पटापट त्याच्यामागून दरींत उड्या टाकतात. तसाच कांहींसा प्रकार आपल्या समाजाचा, विशेषेंकरून ग्रामीण समाजाचा आहे. तेव्हां खेड्यांतील पुढाऱ्यांवर खेड्यांतील चळवळी बऱ्याचशा अवलंबून असतात.

असाहि अनुभव आला कीं, हे खेड्यांतील पुढारी पुष्कळदां आपल्या मनाचा थांग लागूं देत नाहींत. खेड्यांतील जनता मागसलेली असली तरी भोळी मुळींच नाहीं. खेड्यांतील लोकांत व्यवहारबुद्धीची वाण नाहीं. धूर्त माणसेंहि पुष्कळ भेटतात. सडेतोड युक्तिवाद करणारे व माणूस पाहून बोलणारे चतुर लोकहि पुष्कळ आहेत. प्रचारकांची कसोटी करण्याची कलाहि त्यांना अवगत आहे.

खेड्यांत शेतकरीवर्गाचा भरणा फार, जमीन-मालक थोडे; आधिकतर शेतीवर राबणारे मजूरच! वारंवार आम्हांस सांगण्यांत येई कीं, जास्त जमिनीचे मालक ब्राह्मणच आहेत. हे ब्राह्मण खेड्यांत सिंधूंतील बिंदूसारखे असत. शिक्षण, नोकऱ्या वगैरे निमित्तानें हे अधिक जमिनीचे मालक बाहेरगांवीं पुणें-नाशकाकडे गेले आहेत. जे थोडे ब्राह्मण मधूनमधून दिसले ते बाहेरून आलेले डॉक्टर किंवा शिक्षक पेशाचे होते. तेथलेच स्थायिक ब्राह्मण शेतीच्या उत्पन्नावर निर्वाह करतात. पण संस्कृतीच्या बाबतींत भोंवतालच्या जनतेपेक्षां त्यांचा दर्जा फारसा वेगळा दिसला नाहीं!

सांस्कृतिक पातळी समान का असेना, पण खेड्यांत जाती व कुळ यांचें महत्त्व अद्यापहि फार आहे. सरकारनें कायदा करून अस्पृश्यतेचें उच्चाटन केलें तरी खेड्यांत ती आजहि तग धरून आहे. खेड्यांत खऱ्या अर्थानें धर्म नाहीं, लोकाचार आहे. धर्मशास्त्रांत मतभेद असूं शकतो. लोकाचारांत मतभेद कसला? लोकाचाराला राजाश्रयाची गरज नसते. तो प्रजारक्षित असतो. आपल्या गांवगंगेचा किंवा जातगंगेचा ठपका आपणांवर येऊं नये, एवढीच खेड्यांतील सामान्य माणसाची अपेक्षा असते. सामाजिक बाबतींत तो कायदा जाणत नाहीं.

एका खेड्यांत आम्ही पोंचल्यावर मिरवणूक संपतांच मुक्कामाकडे जाण्याची वेळ झाली तेव्हां माझ्या जवळून चालणाऱ्या एका शेतकऱ्याला मीं सहज विचारलें: "आमची सोय कोणाकडे केली आहे?"

"बामणाच्या घरींच केली आहे" तो चटकन् म्हणाला.

मला धक्का बसला! मीं त्याला म्हटलें, "मीं जात का विचारली होती? घरमालकाचें नांव विचारलें होतें!"

शंकरराव जवळच होते. त्यांनीं हा संवाद ऐकला व त्याला ते समजावूं लागले कीं, "आम्हांला सर्वच सारखे आहेत. हरिजनांकडेहि उतरण्याची तयारी आहे. जातीचा उल्लेख करणें अयोग्य आहे." त्यानंतर तो वरमला व दिलगिरी दर्शवीत त्यानें घरमालकाचें नांव सांगितलें.

प्राचीन भारतीय संस्कृतीचा आदर्श वारंवार सांगण्यांत येतो. पण त्या काळीं हीं भारतीय खेडीं राहणी-करणीच्या दृष्टीनें आजच्यापेक्षां अधिक उच्च दर्जाचीं होतीं असें मानण्यास खेड्यांतील प्राचीन किंवा परंपरागत अवशेषांचा बिलकूल आधार नाहीं. मानवी वैयक्तिक व सामाजिक जीवनांतील महत्त्वाच्या बाबी म्हणजे स्वच्छता व आरोग्य यांची उद्वेगजनक उपेक्षा खेड्यांत पिढ्यान्‌पिढ्या करण्यांत आली आहे. संडास, मुत्री, न्हाणीघर यांचें नांव-निशाण खेड्यांत नसतें. रस्ते व गटारें यांचेंहि दर्शन होत नाहीं. स्त्री-पुरुषांचें मलमूत्रविसर्जन व स्नानादिक क्रिया उघड्यावर व्हाव्या अशीच मान्यता सर्वत्र दिसून येते. खेड्यांतील श्रीमंत व प्रतिष्ठित म्हणविणाऱ्या लोकांच्या घरांतूनहि या सोयी










अनुक्रमणिका

आढळणार नाहींत. कोणीं नवीन गोष्ट सुचविली तर लोक ती ऐकून घेतात व सोडून देतात. आपल्या उणीवांची जाणीवहि त्यांना नव्हती.

नाहीं म्हणावयास स्त्रियांची भेट होई तेव्हां संडासाची सोय नसल्याबद्दल त्या तक्रार करीत. पण जबाबदारी पुरुषांवर ढकलून आपण मोकळ्या होत. खेड्यांतील स्त्रियांना पुरुषांपेक्षांहि कमी प्रमाणांत सामाजिक कर्तव्याचें भान आहे. सभांतून त्यांचें अस्तित्व दिसून येत नसे. एकाच गांवांत अपवाद पाहिला.

## ' सरकारनं कायदा करावा '

सभेपूर्वी खेड्यांतील प्रमुख लोक अथवा जाणते किंवा कार्यकर्ते असल्यास त्यांच्यासह खासगी बैठक होऊन चर्चा व्हावी, आपण कां आलों आहोंत तें या निवडक लोकांनीं प्रथम समजून घ्यावें अशी शंकररावांची इच्छा असे. अशा बैठका झाल्याच तर त्यांतून शंकररावच बोलत राहत. कोणी कांहीं-सुद्धां प्रश्न विचारीत नसे किंवा ते काय सांगत तें आपणांस कळलें नाहीं असेंहि दाखवीत नसे. प्रत्यक्ष मुद्द्याची म्हणजे जमीन देण्याची वेळ आली म्हणजे मग त्यांतील वाचाळांना वाचा फुटे व ते आपलें वाक्चातुर्य दाखवूं लागत. आमच्या साथीदारांत एक वकील होते व एक व्यापारी होते. बहुतेक खेड्यांतून वकिलांचीं अशीलें व व्यापाऱ्यांचीं कुळें असतातच. मग परस्परप्रश्नोत्तरें चालत : " आतां, साहेब, आपण आपली फी कधीं कमी करणार ? ", " शेटजी, तुमची माडी देऊन टाका कीं ! ". खेड्यांत त्यागाचा प्रचार करावयास जावयाचें असेल, तर प्रचारकाच्या स्वतःच्या जीवनांत दोष असतां कामा नये. अस्तेय व अपरिग्रह हीं दोन्हीं व्रतें कसोशीनें पाळणाराच प्रभावी प्रचारक होऊं शकेल, निदान लोकांवर त्याचा परिणाम होईल व ते त्याच्याकडे आदरानें पाहतील.

कधीं कधीं शेतकऱ्यांचीं शिष्टमंडळें शंकररावां-जवळ येऊन आपल्या स्थानिक अडचणी दूर करण्यास सांगत. तेल, वाफ व वीज यांच्या सामर्थ्या-वर शहरांनीं खेड्यांतील उद्योगधंदे मारून टाकले आहेत. तेव्हां या नवीन औद्योगिक शत्रूंना तोंड देण्यासाठीं आपण खेड्यांतील सर्व शक्तींची संघटना करून आपला बचाव करून घेतला पाहिजे हें त्यांना कळत नसे. सांगितलें तरी पटत नसे. उलट, शहरांतील धंदे खेड्यांत सुरू करावे व त्यासाठीं सवलती मिळवून देण्याकरितां शंकररावांनीं जरूर तर थेट वर मंत्र्यांपाशीं वशीला लावावा अशी त्यांची अपेक्षा असे. खेड्यांतून आदर्श अहिंसक समाज स्थापण्याच्या शंकररावांच्या कल्पनेला हें चांगलेंच आह्वान होतें.

शंकरराव त्यांना समजावीत. पृच्छक निरुत्तर झाले, तरी वक्त्याचें म्हणणें त्यांना मनापासून पटतच असे असें म्हणतां येणार नाहीं. सर्वोदयाच्या बाबतीं-तहि हाच अनुभव आला. ज्यांच्याजवळ अधिक जमीन आहे त्यांनीं ती कमी जमीन असलेल्यांच्या किंवा मुळींच जमीन नसलेल्यांच्या जोडीनें वांटून घ्यावी, हें त्यांना रुचत असे. पण कमी जमीन असलेल्यांनीं ( आपणां स्वतःस त्यांपैकींच कल्पून ) ती वांटूं नये असें त्यांचें म्हणणें असे. एकदां शंकरराव रस्त्यानें जात असतांना एका दुकानांत चाललेला संवाद त्यांच्या कानावर पडला. एक दुसऱ्यास सांगत होता : " जमीन वांटून घ्यावी हें आपल्याला पसंत आहे. पण ज्यांच्याजवळ वीस एकर जमीन आहे त्यांनीं वांटून द्यावी. कमी असलेल्यांनीं देऊं नये. " शंकररावांना ते सांगत : " तुमचं म्हणणं आम्हांला पटतं. पण सरकारनं कायदा करावा म्हणजे आम्ही ऐकूं. आम्हांला आपसांत करायला सांगाल तर तें होणार नाहीं. " या उत्तरांत आत्मविश्वासाचा अभाव, नागरिकाच्या दर्जाची व जबाबदारीची नेणीव आणि मेषवृत्ति यांचें चांगलें दिग्दर्शन होतें !

## अक्षम्य उपेक्षा !

कसें तरी करून कमाई वाढवून कुटुंबभरण करावें यापलीकडे व्यवहाराचा विशेष आदर्श खेड्यांतील लोकांच्या दृष्टीसमोर नाहीं. लोक नांवें ठेवणार नाहींत असें वागावें, हें त्यांचें नीतिशास्त्र. चोरी, चुगली, छिनालपणा करूं नये, बाकी स्वार्थासाठीं माणसानें काय वाटेल तें करावें, अशी खेड्यांतील सामान्य विचारसरणी आहे. त्यामुळेंच खेड्यांत पक्षापक्षी व गुंडगिरी चालण्यास अवकाश असतो.

खेडीं या परिस्थितीला पोंचलीं आहेत यांत दोष कोणाचा, असा प्रश्न केला तर त्याचें उत्तर







देणें कठीण जाईल. या परिस्थितीला कारणें अनेक आहेत. त्यांत शिरण्यास या लेखांत अवकाश नाहीं. पण एवढें खरें कीं, समाजसुधारक अथवा कार्यकर्ते यांनीं खेड्यांची केलेली उपेक्षा अक्षम्य आहे. निवडणूक आली म्हणजे कार्यकर्ते खेड्यांत प्रवेश करतात. फंडासाठीं, पक्षाच्या वर्गण्यांसाठीं आजपर्यंत कार्यकर्ते खेड्यांत प्रविष्ट झाले आहेत, नाहीं असें नाहीं. पण आत्मीयतेनें त्यांच्यांत वर्षानुवर्षे राहून त्यांच्या सुखदुःखांशीं समरस होऊन निःस्पृहपणें त्यांची सेवा करणारे कार्यकर्ते फार कमी. त्यांना लुटण्यासाठीं जाणारेच अधिक ! यामुळें खेड्यांतील लोकमानस आज साशंक बनलें आहे.

खेड्यांची अद्याप भजन-कीर्तनावर श्रद्धा आहे. देवाधर्माची भाषा ते चटकन् समजतात व ती बोलणाराला मान देतात. श्री. विनोबाजींच्या भाषणांतून पुराणांतील कथा, संतांचीं वचनें, धर्मतत्त्वें सारखीं स्रवत असतात. त्यांचें वैराग्य, तपश्चर्या व त्याग यांनीं त्यांना सामर्थ्यशाली बनविलें आहे. खेड्यांतील काय पण शहरांतील सुद्धां सामान्य जनतेवर त्यांच्या समग्र जीवनाचा व वाणीचा फार परिणाम होतो. त्यांच्या भोंवतीं कसलेले व वर्षानुवर्षे खेड्यांतून सेवाकार्य करणारे विधायक कार्यकर्ते हजर असतात. त्या कार्यकर्त्यांनीं विधायक सेवाकार्यास स्वतःस वाहून तर घेतलें होतेंच. आतां संपूर्ण एकाग्र व एकनिष्ठ होऊन त्यांनीं भूदानयज्ञाच्या कार्यासहि स्वतःस वाहून घेतलें आहे. त्यामुळें तिकडील प्रदेशांत काम पवनवेगानें चालू आहे.

## भूदान आणि सर्वोदय

महाराष्ट्रांतहि कामास वेग येईल आणि त्याचा एक लाख एकरांचा संकल्प पुरा होईल, यांत मला शंका वाटत नाहीं. महाराष्ट्रानें कस्तुरबा-निधि व गांधी-निधि इतर प्रांतांना आश्चर्य वाटेल एवढा गोळा केला. कार्यकर्त्यांच्या मूळ संकल्पावरहि ताण केली ! जमिनीच्या बाबतींतहि तसेंच होईल. कार्यकर्त्यांचा संघ एकदां जागृत होऊन कामास लागल्यावर कोठेंच कांहीं अडणार नाहीं. मला शंका एवढीच वाटते कीं, 'संपत्तिमान् लोकांनीं निधीसाठीं मोठमोठ्या वर्गण्या दिल्या, तरी आर्थिक समानतेचें तत्त्व स्वीकारलें नाहीं. शहरांतून निधीसाठीं वर्गण्या जमवून आर्थिक समता आली नाहीं. तसाच प्रकार आतां खेड्यांतहि होणार कीं काय ?'. खेड्यांतून जमिनी मिळाल्या तरी सर्वोदयाच्या तत्त्वास अनुसरून देशांतील एकूण जमिनीचीं न्यायोचित समान वांटणी करून टाकण्याची वृत्ति ग्रामीण जनतेंत बळावेल काय ? जमिनीचें दान मागणारे वर्गणीच्या पद्धतीनें दान मागतील कीं सर्वोदयाचा संदेश खेडोपाडीं व घरोघरीं पोंचवितील ? व जे सर्वोदयाचा संदेश घेऊन जातील त्यांचें स्वतःचें जीवन संशयातीत किंवा आक्षेपातीत असेल काय ?

विनोबाजी क्रांतियुगाची तयारी करीत आहेत. त्यांच्या या कार्यांत त्यांना मदत करूं इच्छिणारे सर्व पंथांचे व मतांचे कार्यकर्ते सर्वोदयाचा प्रचार करतील काय ? नुसत्या जमिनी मिळवून सर्वोदय संपूर्ण होणार नाहीं. बेकारी गेली पाहिजे. ग्रामोद्योग सुरू झाले पाहिजेत. खेडीं स्वावलंबी झालीं पाहिजेत. परिणामीं, अवाढव्य राक्षसी शहरांचें उच्चाटन झालें पाहिजे आणि जनतेचें आर्थिक स्वातंत्र्य नष्ट करणारे, तिला बेकार ठेवणारे यांत्रिक कारखाने बंद झाले पाहिजेत. लष्करांचेंहि विसर्जन झालें पाहिजे. सर्वांनीं शरीरश्रम केले पाहिजेत. या सर्व गोष्टी या सर्वोदयाच्या संदेशांत अभिप्रेत आहेत. शहरी लोकांना तर त्या पटणारच नाहींत. खेड्यांतील लोकांत साशंकता तर आहेच.

तरी देखील विनोबाजी आपल्या भाषणांतून ग्रामीण जनतेला वारंवार सांगतातः 'माझी गोष्ट तुम्ही ताबडतोब कबूल केली नाहींत तरी मला त्याचें दुःख नाहीं. उलट, तुम्ही लगेच कबूल झालां असतां तर मला भीति वाटली असती. हिंदी समाज हा फार जुना, कसलेला व अनुभवी समाज आहे. अनेक स्थित्यंतरांतून तो गेला आहे. नवी गोष्ट ती नवी आहे म्हणून तो ताबडतोब स्वीकारीत नाहीं. ती तो कसाला लावून पाहतो, प्रतीक्षा करतो व ती कसास उतरली तरच तिचा स्वीकार करतो. असें जर त्यानें केलें नसतें तर प्रत्येक नवीन कल्पनेच्या स्वीकारामुळें समाजांत अनवस्था निर्माण झाली असती !'










अनुक्रमणिका

येत्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या नियोजित अध्यक्षांचें व्यक्तित्व व वाङ्मय : आ. प्र. के. अत्रे

# ● ● ● ● कृष्णाजी पांडुरंग

अलीकडे मी पाहतों आहे कीं, समाजांतील विद्वान् आणि व्यासंगी माणसांची सामान्य माणसांना मुळीं माहितीच नसते. आजच्या जीवनांतलें हें एक मोठें शल्य आहे. अमळनेरला भरणाऱ्या साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदीं जेव्हां प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी ह्यांची परवां निवड झाली, तेव्हां त्यांना पुष्कळ वर्षांपासून ओळखणाऱ्या एका चांगल्या सुशिक्षित माणसानें मला ( अर्थात् भीत-भीतच ) विचारलें कीं, " काय हो, हे साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष कसे काय झाले ? " मीं गप्पच बसलों ! काय उत्तर देणार ? हंसलों नुसता ! कविता, कादंबऱ्या किंवा नाटकें जो लिहितो तो साहित्यिक अन् तोच तेवढा साहित्य-संमेलनाचा अध्यक्ष होण्यास लायक असतो अशीच पुष्कळांची समजूत आहे. ह्या पद्धतीचें वाङ्मय तर प्रा. कुलकर्णी ह्यांनीं कांहीं लिहिलेलें नाहीं. बरें, गेलीं तीस-पस्तीस वर्षें जो व्यासंग ते करीत आहेत किंवा जें ग्रंथ-कर्तृत्व त्यांनीं केलें आहे, त्याची माहिती त्या विषयांच्या तज्ज्ञांखेरीज किंवा फार झालें तर त्यांच्या ग्रंथांचा विश्वविद्यालयीन परीक्षांसाठीं अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांशिवाय इतरांना कशी असूं शकणार ? आजच्या मराठी लेखकांना आणि साहित्य-सेवकांना तरी प्रा. कुलकर्णी ह्यांची विशेष माहिती आहे म्हणतां कीं काय ? ठोकळ मानानें ते एक मोठे विद्वान् आहेत, एवढेंच त्यांना ठाऊक आहे. आणि ह्या त्यांच्या ' अज्ञात ' विद्वत्तेमुळेंच सर्व साहित्यिक त्यांना वचकून असतात. पण त्यांच्या व्यासंगाचा नि विद्वत्तेचा तपशील जर तुम्ही ह्या लेखकमंडळींना विचाराल कीं नाहीं, तर त्यांची निःसंशय घांदल उडाल्याखेरीज राहणार नाहीं ! प्रा. कुलकर्णी ह्यांना प्रसिद्धीचा, पदवीचा किंवा सन्मानाचा पहिल्या-पासूनच कंटाळा. त्यांतून व्युत्पत्ति, व्याकरण, भाषाशास्त्र, इतिहाससंशोधन हे त्यांच्या व्यासंगाचे नि लेखनाचे विषयहि असे एकेक दुर्गम कीं, सामान्य वाचकांना त्यांची साधी माहिती सांगूं म्हटलें तरी कठीण ! मग त्यांची प्रसिद्धि करणें तर बाजूलाच राहिलें. एखाद्या कादंबरीची जशी जाहिरात करतां येते कीं, ही कादंबरी एकदां हातांत घेतली कीं ती पुरी केल्याखेरीज खालीं ठेववत नाहीं, तशी प्रा. कुळकर्णी ह्यांच्या नऊशें पानांच्या ' व्युत्पत्तिकोश ' ची थोडीच जाहिरात करतां येते कीं, आलतुफालतु माणसांना हा कोश डोक्यापर्यंत उचलतां येणार नाहीं म्हणून ! आपण साहित्यिक आहोंत असा स्वत: प्रा. कुलकर्णी ह्यांनींहि आजपर्यंत कधीं दावा केलेला नाहीं. छत्तीस सालीं पुण्याच्या शारदोपासक-संमेलनाचे आम्हीं त्यांना जेव्हां अध्यक्ष निवडलें, तेव्हां ते म्हणाले : " सध्यांचें युग हें जिवंत वाङ्मयनिर्मितीचें आहे, आणि मीं तर तसली वाङ्मयनिर्मिति कांहीं केलीच नाहीं. स्फूर्ति, सद्देवणा मजजवळ बिलकूल नाहीं. एका बाजूला राहून रूक्ष अशा विषयांत काम करणाऱ्या मनुष्यांपैकीं मी एक आहें. " एकदां असेच कोणी तरी त्यांची वाङ्मयीन मुलाखत घ्यावयास आले, तेव्हां ते आपल्या नेहमींच्या संकोची वृत्तीनें म्हणाले : " अरे, आमच्या कसल्या मुलाखती तुम्ही घेतांहात ? आम्ही कांहीं 'काश्मिरी गुलाब' लावला नाहीं, ' दोन ध्रुव ' गांठले नाहींत किंवा ' सोन्याचा कळस 'हि बनविला नाहीं. आम्ही ' शब्दसृष्टी 'चे किंवा कल्पनासृष्टीचे थोडेच ' ईश्वर ' आहोंत ? आम्ही केवळ सरस्वतीच्या सदनांतील अडगळ साफसूफ करणारी मंडळी ! " अशा तऱ्हेनें स्वतःला साहित्यिक समजावयाला जिथें प्रा. कुलकर्णी यांचीच मुळीं तयारी नाहीं, तिथें इतरांचा काय दोष ?

**प्राध्यापकाच्या योग्यतेचा विद्यार्थी !**

इतरांचें कशाला ? माझें स्वतःचेंच मी सांगतोः

पंचवीस सालीं माझी त्यांची ओळख झाली. शिक्षणशास्त्राच्या अभ्यासासाठीं आम्ही एका वर्गांत योगायोगानें आलों. त्या वेळीं ते सरकारी कॉलेजांत संस्कृताचे प्राध्यापक होते. जवळजवळ एक वर्ष आम्ही एकत्र राहत होतों. पण मराठी भाषा आणि साहित्य या विषयावरील आपल्या व्यासंगाची त्यांनीं कधीं गंधवार्ता मला लागूं दिली नाहीं. त्यांचा 'भाषाशास्त्र आणि मराठी भाषा' हा ग्रंथ वस्तुतः त्याच सुमारास प्रसिद्ध झालेला होता. पण त्यासंबंधीं कधीं अवाक्षरहि त्यांच्या तोंडून निघालें नसल्यानें आम्हांला त्याची मुळीं माहितीच नव्हती. स्वतःसंबंधीं ते क्वचितच बोलत. नेहमीं दुसऱ्याचेंच ऐकून घेत आणि त्याचेंच कौतुक करीत. वाङ्मयासंबंधीं कधीं वादहि त्यांनीं केल्याचें मला आठवत नाहीं. संस्कृत भाषेचे प्राध्यापक असूनहि आपल्या पांडित्याचें प्रदर्शन करण्याचा चुकूनहि त्यांनीं कधीं प्रयत्न केला नाहीं. सर्वांशीं ते हंसून खेळून सारखेपणानें वागत. त्यामुळें त्यांच्या विद्वत्तेचा 'संशय' कोणालाहि येणें शक्यच नव्हतें! सर्वांना ते आपल्याच पातळीवरचे अन् मगदुराचे आहेत असें वाटे. पण वर्ष संपतां संपतां एक दिवस असा उगवला कीं, एका क्षणांत त्यांच्याकडे बघण्याची आमची दृष्टीच मुळीं बदलून गेली. त्यांच्या खोलींत एकदां आम्ही असे गप्पा मारीत बसलों होतों. बोलतां बोलतां कांहीं तरी संदर्भ निघाला. त्याबरोबर ते शान्तपणें उठले आणि आपल्या कपाटांतून 'संस्कृत नाटकें आणि नाटककार' हा आपला इंग्रजी भाषेंत लिहिलेला छापील ग्रंथ त्यांनीं बाहेर काढून आमच्या हातीं ठेवला. तो बघून आम्ही सर्दच झालों! आणि त्यांच्या चेहऱ्याकडे टकाटका बघूं लागलों. प्रा. कीथसारख्या आंग्ल पंडितानें त्यांच्या या ग्रंथावर उत्कृष्ट अभिप्राय दिलेला वाचून तर आमचे डोळेच दिपले. ह्या धक्क्यानें आम्ही इतकें हादरून गेलों कीं, पुन्हां पंधरा दिवस त्यांच्या खोलीवरूनसुद्धां आम्ही फिरकलों नाहीं! एवढा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा विद्वान् माणूस आपल्या वर्गांत आहे, ह्या गोष्टीवर विश्वास ठेवायला निदान आमच्या मनाची तरी तयारी नव्हती. आणखी महिना-पंधरा-दिवसांनीं 'प्राचीन भारतांतील शिक्षणपद्धति' ह्या विषयावरील आपल्या इंग्रजी ग्रंथाचें हस्तलिखित दाखवून त्यांनीं आम्हांला दुसरा जबर धक्का दिला. त्या वेळीं तर आम्ही कोलमडलोंच! ती बातमी जेव्हां आम्हीं आमच्या प्राध्यापकांना सांगितली, तेव्हां त्यांची तर बोबडीच वळली! ते म्हणाले, "एवढा विद्वान् विद्यार्थी वर्गांत असतांना त्याच्यासमोर प्राचीन भारतामधील शिक्षण-पद्धतीवर मी काय व्याख्यान देऊं शकणार?" त्यानंतर प्रा. कुलकर्णी ह्यांच्या विद्वत्तेबद्दल निदान आमच्या ट्रेनिंग कॉलेजमध्यें तरी कोणालाहि संशय राहिला नाहीं. सदर कॉलेजांत प्राध्यापक म्हणून यावयाच्याऐवजीं चुकून हा माणूस विद्यार्थी म्हणून आला आहे असेंच सर्वजण म्हणूं लागले. एखाद्या नाटकांतलें रहस्य ज्याप्रमाणें प्रेक्षकांना हळू हळू उलगडत जातें, त्याप्रमाणें प्रा. कुलकर्णी ह्यांच्या व्यासंगाची दालनेंसुद्धां महाराष्ट्रासमोर अशींच हळूहळू आणि प्रसंगाप्रसंगानें प्रकट होत गेलीं आणि त्यांच्या मौलिक बुद्धिमत्तेनें विद्वानांना चकित करून टाकलें.

### शुद्धलेखन-समितीचे चिटणीस

एकोणतीस सालीं बेळगांवला शिवरामपंत परांजपे ह्यांच्या अध्यक्षतेखालीं साहित्य-संमेलन भरलें होतें. ह्या संमेलनानें एक शुद्धलेखन-समिति नेमली. त्या समितीचे चिटणीस ह्या नात्यानें प्रा. कुलकर्णी ह्यांनीं साहित्य-संमेलनाच्या कार्यक्षेत्रांत पहिलें पाऊल टाकलें. या समितीनें नवीन शुद्ध-लेखनाचे जे नियम प्रा. कुलकर्णी ह्यांच्या नेतृत्वाखालीं तयार केले, त्याला पुढल्या वर्षीं गोव्यास भरलेल्या संमेलनानें मान्यता दिली. अनुच्चारित अनुस्वार अजिबात काढून टाकावेत असा शुद्ध-लेखन-सुधारकांचा एक पक्ष त्या वेळीं निर्माण झाला होता. तात्यासाहेब केळकर आणि पावगी ह्यांचा त्या पक्षाला पाठिंबा होता. तथापि, प्रा. कुलकर्णी ह्यांनीं त्या पक्षाला जोरदार विरोध करून आपल्या प्रतिपक्ष्यांचा धुव्वा उडवून टाकला. व्युत्पत्ति, व्याकरण आणि रूढि ह्यांचा विचार करूनच कोणताहि अनुस्वार ठेवावयाचा का काढावयाचा हें ठरविलें पाहिजे, ही प्रा. कुलकर्णी








ह्यांची भूमिका होती. कोल्हापूरच्या साहित्य-संमेलनांत ह्या विषयावर त्यांनीं जें विलक्षण आवेशपूर्ण भाषण केलें तें अद्यापहि माझ्या कानांत निनादत आहे. शुद्धलेखनासारख्या किंवा व्याकरणासारख्या विषयावर एवढें ज्वलन्त आणि प्रभावी वक्तृत्व करतां येतें ह्याची मलाच काय, पण कोणालाच त्या वेळपर्यंत कल्पना नव्हती. ह्या एका भाषणानें प्रा. कुलकर्णी ह्यांनीं साहित्य-संमेलन जिंकलें आणि साहित्यक्षेत्रामधील आपलें स्थान अढळ केलें. साहित्य-संमेलनानें मंजूर केलेल्या शुद्धलेखन-नियमांचा प्रसार करण्यासाठीं प्रा. कुलकर्णी ह्यांनीं हाडांचीं काडें करून शेंकडों नवीन पुस्तकांचीं मुद्रितें त्या पद्धतीनें तपासून दिलीं आणि छापखान्यामधील जुळाऱ्यांचे वर्गसुद्धां चालविले. एवढेंच नव्हे तर, शुद्धलेखनाच्या दृष्टीनें अनेक प्राचीन ग्रंथांचें आणि हस्तलिखितांचें संशोधन करून अनुस्वार हे कोंकणांतून आले ही समजूत चुकीची आहे, हें त्यांनीं सप्रमाण दाखवून दिलें.

## समर्थ इतिहासकार

ह्याच सुमारास पेशवेदप्तराच्या संशोधनाचें काम पुणें येथें सरकारनें रियासतकार सरदेसायांच्या नेतृत्वाखालीं सुरू केलें. शिक्षणखात्यामधलि एक विद्वान् संशोधक म्हणून प्रा. कुलकर्णी ह्यांची सरदेसायांचे मदतदार म्हणून सरकारनें निवड केली. प्रा. कुलकर्णी ह्यांच्या आयुष्यामधली ही एक अत्यंत महत्त्वपूर्ण घटना होती. महाराष्ट्राच्या इतिहासाचा मौलिक अभ्यास करण्याची ही सुवर्ण-संधि मोठ्या भाग्यानेंच त्यांच्याकडे चालत आली. खरोखर, महाराष्ट्राच्या संशोधनकार्याच्या इतिहासांत पेशवेदप्तराच्या संशोधनाचें एक स्वतंत्र पर्व म्हणूनच गणलें जाईल. हें काम केवढें अजस्र होतें ह्याची कोणाला कल्पनाहि होणार नाहीं. हजारों कागदपत्रांचे डोंगर उपसण्याचें कार्य पांच वर्षें अव्याहतपणें चाललें होतें. अन् त्यांतून निवडलेल्या दहाहजार पृष्ठांचा अव्वल दर्जाचा ऐतिहासिक मजकूर पंचेचाळीस खंडांत प्रसिद्ध करण्यांत आला. या संशोधनानें मराठ्यांच्या इतिहासांत नवीन ज्ञानाची आणि सामग्रीची केवढी प्रचंड भर घातली ह्याचा आढावा प्रा. कुलकर्णी ह्यांनीं एका स्वतंत्र लेखांत घेतलेला आहे. ह्या पांच वर्षांच्या प्रखर तपश्चर्येनें प्रा. कुलकर्णी ह्यांच्या विद्वत्तेचें एक नवीनच दालन खुलें केलें. तोंपर्यंत केवळ भाषा-शास्त्री म्हणूनच ते प्रसिद्ध होते. पण त्यानंतर इतिहाससंशोधक या नात्यानें त्यांच्या प्रतिभेचे नवनवीन पैलू महाराष्ट्राला दिसूं लागले. ३७ सालीं मध्यप्रांत-संशोधन-मंडळाच्या वार्षिक संमेलनाचे अध्यक्ष होण्याचा बहुमान त्यांना लाभला. ह्या प्रसंगीं 'मराठ्यांच्या उत्कर्षापकर्षाची मीमांसा' करणारा जो एक स्वतंत्र प्रबंध त्यांनीं वाचून दाखविला, त्यानें न्या. भवानीशंकर नियोगींसारखे पंडितसुद्धां चकित झाले! ते म्हणाले : 'न्यायमूर्ति रानड्यांनंतर मराठ्यांच्या इतिहासाचें असें मौलिक विवेचन दुसऱ्या कोणीं केल्याचें मला माहीत नाहीं.' भोसल्यांच्या आणि पेशव्यांच्या सहा पिढ्यांतल्या राज्यकर्त्यांच्या गुणावगुणांचें मार्मिक विश्लेषण करून, कोणत्याहि राजकुलाचा उत्कर्षापकर्ष आनुवंशिक गुणांच्या उत्कर्षापकर्षांवर अवलंबून असतो आणि मूळ संस्थापकाच्या प्रतिष्ठेची ज्योत जास्तींत जास्त चार पिढ्यांपर्यंत तेवत राहते, हा एक नवा सिद्धान्त प्रा. कुलकर्णी ह्यांनीं ह्या आपल्या प्रबंधांत मांडलेला आहे. एवढेंच नव्हे तर मराठ्यांच्या इतिहासांतील कांहीं महत्त्वाच्या प्रश्नांवर गेल्या दहा-बारा वर्षांत त्यांनीं अनेक स्फुट लेख लिहून नवीन प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, युद्धापेक्षां तहांना जास्त महत्त्व आहे ही गोष्ट मराठ्यांनीं ओळखली नाहीं, म्हणून त्यांनीं युद्धें जिंकलीं असलीं तरी तह गमावले, असा त्यांनीं निष्कर्ष काढला आहे. मराठ्यांना युद्धांचा उपयोग दूरदृष्टीनें व पूर्णत्वानें करून घेतां आला नाहीं ह्याचें कारण मराठ्यांच्या स्वभावांत आहे, असें ते म्हणतात. सैन्य घेऊन मराठे परप्रांतांत जात, पण मोहीम संपवून आपण घरीं कधीं परत येतों, ह्याकडे त्यांची दृष्टि असे. दुसऱ्या प्रांतांत फार दिवस कंठणें त्यांच्या जिवावर येई. मग तेथें वसाहत करून राहण्याची गोष्ट कशाला? त्याखेरीज जमाबंदीच्या शिस्तवार पद्धतीचा अभाव, राजकारणाची कोती दृष्टि, वतनाचा फाजील अभिमान,









अनुक्रमणिका

इत्यादि दोषांमुळें मराठ्यांना युद्धामध्यें मिळविलेल्या जयाचा कधीं फायदा करून घेतां आला नाहीं, असा त्यांचा अभिप्राय आहे. त्याचप्रमाणें मराठ्यांनीं परकीय सत्तांच्या दरबारांत नालायक माणसांना वकील म्हणून पाठवून आपलें फार नुकसान करून घेतलें, असेंहि त्यांचें म्हणणें आहे. इंग्रजांच्या बाजूला मालकम, एल्फिन्स्टन ह्यांच्यासारखे पहिल्या पट्टीचे राजकारणी मुत्सद्दी होते, तर त्यांना तोंड देण्याचें काम पेशव्यांनीं गणेशपंत पिटके अन् मोरदीक्षित मराठे ह्यांच्यासारख्या फडतूस माणसांकडे सोंपविलें ! अशा परिस्थितींत मराठ्यांच्या राज्याचें वाटोळें न झालें असतें तरच नवल होतें, असें ते म्हणतात. मराठ्यांच्या नाशाला 'उत्तर-दक्षिण वाद' हेंहि एक कारण घडलें, असें त्यांनीं एका लेखांत सप्रमाण सिद्ध केलें आहे. उत्तरेच्या राजकारणांत मराठ्यांनीं शौर्य गाजविलें पण अपरंपार कर्ज केलें. जिंकलेला प्रदेश नव्या सरदारांनीं आपआपसांत वांटून घेतला. दक्षिणेच्या राजकारणापासून मात्र त्यांना अलोट द्रव्याचा लाभ झाला. उत्तर व दक्षिण ह्या राजकारणाकडे सारखेंच लक्ष दिलें असतें तर मराठ्यांचें सामर्थ्य अन् संपत्ति इतक्या लौकर कमी झाली नसती, असा त्यांचा निष्कर्ष आहे. अशा रीतीनें मराठी सत्तेच्या उत्कर्षाचा आणि अपकर्षाचा अतिशय बारकाईनें प्रा. कुलकर्णी ह्यांनीं विचार करून आपले स्वतःचे त्याबाबत कांहीं ठाम सिद्धान्त बसविले आहेत. वस्तुतः पेशवेदप्तराच्या संशोधनानंतर उत्तरकालीन मराठशाहीचा इतिहास पुन्हां नव्यानें लिहिला गेला पाहिजे. हें बिकट कार्य करण्यास प्रा. कुलकर्णी ह्यांच्याखेरीज दुसरा कोणी समर्थ इतिहासकार निदान आमच्या डोळ्यांना तरी दिसत नाहीं.

## राजवाड्यांपासून स्फूर्ति

पेशवेदप्तराचें संशोधन चालूं असतांनाच 'मराठी भाषा : उद्गम आणि विकास' हा महत्त्वाचा ग्रंथ लिहिण्याचें प्रा. कुलकर्णी ह्यांचें काम सुरू होतेंच. ह्या ग्रंथानें मराठी भाषेच्या अभ्यास-शास्त्रामध्यें फार महत्त्वाची क्रान्ति घडवून आणली. या विषयावरील एक प्रमाणग्रंथ म्हणून अनेक विश्वविद्यालयांकडून त्याला मान्यता मिळालेली आहे. हा ग्रंथ म्हणजे भाषाशास्त्रावरील त्यांच्या जवळजवळ पंधरा-सोळा वर्षांच्या व्यासंगाचें आणि संशोधनाचें फळ होय. भाषाशास्त्राची मूळ गोडी फर्ग्यूसन कॉलेजांत शिकत असतांना त्यांना डॉ. पांडुरंग दामोदर गुणे ह्यांच्यामुळें जरी लागली असली, तरी त्या विषयाच्या शास्त्रीय अभ्यासाची दृष्टि त्यांना इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ह्यांच्याकडूनच मिळाली. राजवाड्यांना ते तर आपले गुरुच मानतात. व्युत्पत्तिशास्त्राची थट्टा करतां करतां ते त्या शास्त्राच्या अभ्यासाकडे गंभीरपणें कसे वळले हा एक मोठा मनोरंजक इतिहास आहे सतरा सालीं प्रा. कुलकर्णी हे धुळें येथें शिक्षक होते. त्या वेळीं भारत-इतिहास-मंडळाच्या इतिवृत्तांत राजवाडे आणि खरे वगैरे विद्वान् मंडळी शब्दांच्या व्युत्पत्ती देत. ह्या व्युत्पत्तींची चेष्टा करणें हा प्रा. कुलकर्णी आणि कांहीं शिक्षक ह्यांचा मधल्या सुट्टींत वेळ घालविण्याचा नित्याचा व्यवसाय होऊन बसला होता. एकदां त्यांच्या ह्या थट्टेची मजल इतकी गेली कीं 'चिमणी' हा शब्द 'जैमिनि' शब्दापासून व्युत्पन्न झाला असें त्यांनीं सिद्ध केलें ! एवढ्यांत एके दिवशीं रस्त्यांतून जातांना खुद्द इतिहासाचार्य राजवाड्यांची अन् त्यांची गांठ पडली. त्यांनीं राजवाड्यांना सहज नमस्कार केला. तेव्हां राजवाड्यांनीं त्यांची चास्तपूस्त करून 'कांहीं अभ्यास करावयाचा असेल तर येत जा उद्यांपासून !' असें त्यांना सांगितलें. राजवाड्यां-च्या सहवासांत चार-आठ दिवस गेले नाहींत तोंच भाषाशास्त्राकडे बघण्याच्या त्यांच्या दृष्टींत आमूलाग्र क्रान्ति होऊन गेली. पूर्वींची चेष्टावृत्ति चद्कारी नाहींशी झाली आणि तिची जागा निष्ठावृत्तीनें घेतली. सुबन्त-आणि-तिङन्त-विचार, ज्ञानेश्वरीचें व्याकरण, महिकावतीची बखर, राधा-माधव-विलासचंपू ह्यांच्या भोंवऱ्यांत तेव्हांपासून प्रा. कुलकर्णी जे गिरक्या मारूं लागले ते पुन्हां कांहीं बाहेर आले नाहींत ! त्या विषयाच्या अगदीं तळाशीं ते जाऊन पोहोंचले. प्रा. कुलकर्णी ह्यांना कोणी तरी थट्टेनें म्हणाले : "काय सांगतां तुम्हीं !



अनुक्रमणिका








राजवाड्यांच्या ' सुबन्त-विचारा'नें तुम्हांला भाषाशास्त्राच्या अभ्यासाची स्फूर्ति मिळाली ही गोष्ट कोणाला खरी तरी वाटेल का ? ''—तेव्हां प्रा. कुलकर्णी गंभीर मुद्रा करून म्हणाले : " गुरुमुखांतून स्फूर्ति मिळण्याचा हा विषय मोठा विचित्र आहे. विसोबा खेचरासारख्या गलिच्छ थेरड्याकडून नामदेवाला कशी स्फूर्ति मिळाली ! एकनाथाला जनार्दनस्वामींनीं स्फूर्ति दिली खरी. पण त्या वेळेस त्यांनीं असें अकाळविकाळ स्वरूप धारण केलें होतें म्हणतां ! तुमच्या वामनपंडिताला तर एका ब्रह्मसमंधानें स्फूर्ति दिली. अर्थात् ह्या गोष्टी फार मोठ्यांच्या आहेत. पण त्यावरून माझ्या स्फूर्तींचें मर्म तुमच्या ध्यानीं येईल ! ''

## मराठी भाषेचें एक अमर भूषण

सतरा सालीं गुरुमुखांतून जें स्फूर्तीचें बीज प्रा. कुलकर्णी ह्यांच्या बुद्धींत रोवलें गेलें त्याला तीस वर्षांनंतर ' व्युत्पत्तिकोश ' ह्या प्रचंड वटवृक्षाचें स्वरूप प्राप्त झालें. अडीच तपें व्युत्पत्तिशास्त्राच्या अभ्यासाची प्रा. कुलकर्णी ह्यांनीं जी उग्र तपश्चर्या केली तिला मिळालेलें तें महाफल होय. त्यांच्या व्यासंगाची आणि बुद्धिमत्तेची तर ती परिसीमाच होय, पण मराठी भाषेचें तें एक अमर भूषण आहे, ह्यांत मुळींच शंका नाहीं. अडतीस सालीं सावरकरांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईला भरलेल्या साहित्य-संमेलनानें व्युत्पत्ति-कोश लिहिण्याचें हें काम त्यांच्याकडे प्रथम सोंपविलें. डॉ. बाबासाहेब जयकर ह्यांनीं त्यासाठीं एक हजार रुपयांची देणगी त्यांना दिली. तथापि, ह्या कार्याचा मूळ पाया राजवाडे ह्यांचा ' धातुरूपकोश ' संपादून त्यांनीं पूर्वींच घातलेला होता. त्या कोशाला त्यांनीं अडतीस पानांची प्रदीर्घ प्रस्तावना जोडलेली आहे. व्युत्पत्तिकोश लिहिण्याचें प्रा. कुलकर्णी ह्यांचें कार्य सतत दहा वर्षें चाललें होतें. जवळजवळ पन्नास हजार शब्दांच्या व्युत्पत्ती ह्या कोशांत आलेल्या असून त्यांत सत्तावीस भाषांचे संदर्भ देण्यांत आले आहेत. त्याखेरीज ह्या कोशाला सव्वाशें पानांची अत्यंत विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहून तिच्यांत प्रा. कुलकर्णी ह्यांनीं व्युत्पत्तिशास्त्राचें तौलनिक आणि ऐतिहासिक समालोचन केलेलें आहे. ही प्रस्तावना म्हणजेच एक स्वतंत्र ग्रंथ आहे. वस्तुतः दहा ' डॉक्टरेट ' पदव्या त्यांना मिळाव्यात एवढी तिची योग्यता आहे. कलकत्ता-विश्वविद्यालयाचे भाषापंडित डॉ. सुनीतिकुमार चतर्जी ह्यांनीं तर ह्या कोशाची अतिशय प्रशंसा केलेली आहे. प्रा. कुलकर्णी ह्यांच्या या प्रचंड ग्रंथकर्तृत्वामधले कांहीं दोष किंवा उणीवा दाखविण्याचाहि कित्येकांनीं प्रयत्न केला, नाहीं असें नाहीं. पण तेवढ्यानें त्यांच्या अद्वितीय कार्याचें महत्त्व किंवा यश थोडेंच कमी होतें ? 'धातुरूपकोशा'च्या प्रस्तावनेंत जणूं कांहीं ह्याच दोषदर्शकांना त्यांनीं आधींच उत्तर देऊन ठेवलेलें आहे. तेथें ते म्हणतात : " क्षेत्र विस्तृत असलें म्हणजे कांहीं बारीकसारीक गोष्टींकडे दुर्लक्ष होतें. गरुडाची भरारी उंच गेली म्हणजे त्याच्या दृष्टिकोनाचा विस्तार साहजिकच वाढतो. मग त्याला जमीनीवरील क्षुद्र खबदाडें दिसलीं नाहींत तर त्यांत काय आश्चर्य ? ज्यांना केवळ खबदाडांची लांबीरुंदी मोजावयाची आहे त्यांनीं तेंच काम जन्मभर करीत बसावें ! ''

' व्युत्पत्तिशास्त्रासारख्या अत्यंत वैराण विषयांत तुम्ही वर्षानुवर्षें कसें काय तन्मयतेनें वावरूं शकतां ? ' असा एकदां कोणीं प्रा. कुलकर्णी ह्यांना प्रश्न केला तेव्हां ते म्हणाले : " भाषाशास्त्राचा किंवा शब्दशास्त्राचा विषय तुम्हांला रूक्ष आणि क्लिष्ट वाटतो खरा; पण त्याला आपल्याइकडे फार जुनी परंपरा आहे. प्राचीन काळीं वेदांच्या अभ्यासाला हीं शास्त्रें ऋषींना फार उपकारक वाटत. रोजचीं धर्म्य कामें पार पाडल्यानंतर त्या वेळचे ऋषी आणि ब्रह्मवादी पंडित जेव्हां एकत्र जमत, तेव्हां शब्दशास्त्रांत आपल्या बुद्धीची कुशाग्रता चालवून ते परस्परांचें मनोरंजन करीत. ह्याचीं उदाहरणें आरण्यक ग्रंथांत किती तरी आहेत ! निरनिराळ्या शब्दांची व्युत्पत्ति देऊन आपल्या बुद्धीची कसरत करणें हा त्यांच्या करमणुकीचा एक खेळ होता. आपल्या प्राचीन शास्त्रसूरींनीं भाषाशास्त्राचा एवढा अभ्यास करून ठेवला म्हणून पाश्चात्य भाषापंडितांना ह्या शास्त्राचा अभ्यास करणें आज शक्य झालें आहे, हें तुम्हांला कुठे ठाऊक आहे !








अहो, पाणिनीच्या व्याकरणाचें संशोधन जर झालें नसतें तर आजचें पाश्चात्य भाषाशास्त्र मुळीं निर्माणच झालें नसतें, आहांत कुठें ?'' व्याकरण या विषयासंबंधीं एकदां बोलत असतांना ते म्हणाले : '' अहो, पूर्वींच्या काळीं नायकांना-सुद्धां व्याकरण येत असे. शातवाहन राजाची तुम्हांला गोष्ट सांगतों. हा राजा एकदा आपल्या राणीवशांत जलक्रीडा करीत असतां त्याच्या एका राणीनें त्याला 'मोदकैः ताडय' अशी विनंति केली. त्याचा राजाला नीट अर्थ कळला नाहीं. 'मा उदकैः ताडय' 'माझ्या अंगावर पाणी उडवूं नका ' असें तिला सांगावयाचें होतें. पण राजानें तिला प्रत्यक्ष मोदकांनींच मारण्यास सुरवात केली. हें बघून सर्व राण्या त्याला हंसूं लागल्या. राजा खजील झाला. त्याला आपल्या अज्ञानाबद्दल वाईट वाटलें व त्या दिवसापासून त्यानें व्याकरण शिकावयास प्रारंभ केला.''

### भाषाशास्त्र आणि साहित्य

व्याकरणाचा आणि समाजजीवनाचा फार निकट संबंध आहे, हा प्रा. कुलकर्णी ह्यांचा एक अत्यंत महत्त्वाचा सिद्धान्त आहे. 'धातुरूपकोशा'च्या प्रस्तावनेंत त्यांनीं तो मांडलेला आहे. भाषेंत जेवढे धातु अधिक तेवढीं क्रियापदें अधिक, अन् ज्या भाषेंत क्रियापदें अधिक त्या समाजांत क्रियाशीलता किंवा कर्तृत्वशक्ति अधिक, हा त्यांच्या ह्या सिद्धान्ताचा मुख्य आशय आहे. ते म्हणतात, '' एखाद्या राष्ट्राचा किंवा समाजाचा उद्योग त्याच्या भाषेवरून कळतो. भाषा ही समाजाच्या चलनवलनाचा आरसा आहे. तिच्यामध्यें समाजांतील यच्चयावत् हालचाल प्रतिबिंबित झालेली असते. समाज जितका संपन्न तितकीच त्याची भाषा संपन्न. समाजाची हालचाल त्याच्या क्रियेमध्यें दिसून येते आणि भाषेंतील क्रियादर्शक शब्द म्हणजे धातु होत. भाषेंतील धातु पाहून ती भाषा बोलणाऱ्या समाजाची संस्कृति अजमावतां येते. ''

व्युत्पत्ति किंवा व्याकरण हा विषय सामान्य बुद्धीच्या माणसांना अत्यंत मनोरंजक करून दाखविण्यांत प्रा. कुलकर्णी ह्यांचा विशेष हातखंडा आहे. सत्तेचाळीस सालीं बडोदा सरकारनें ज्या पांच विद्वानांचा सत्कार केला त्यांपैकीं प्रा. कुलकर्णी एक होते. त्या प्रसंगीं ' मराठी शब्द-सृष्टींतील चमत्कार ' ह्या विषयावरील त्यांचा प्रबंध हा त्यांच्या आकर्षक प्रतिपादनशैलीचा एक उत्कृष्ट नमुना आहे. ह्या प्रबंधाचा उपसंहार करतांना त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, '' भाषाशास्त्राचें क्षेत्र फार मोठें आहे. ध्वनीला अर्थ मिळाला म्हणजे तो गतिमान् होतो. अर्थपूर्ण ध्वनि झाल्यानें व्यवहार शक्य होतो आणि वाङ्मय निर्माण होऊं शकतें. ध्वनीमधल्या अर्थाला विशिष्ट अर्थ प्राप्त झाला म्हणजे वाङ्मयांत सौंदर्य आणि कला उत्पन्न होते. ध्वनीवर आधारलेल्या वाङ्मय आणि गायन ह्या कला इतर सर्व कलांपेक्षां श्रेष्ठ आहेत. कारण त्यांमध्यें गतिमत्त्व असून त्यांना दिक्कालाचें बंधन नाहीं. तथापि, गायनापेक्षांहि वाङ्मयाला दिक्कालाचें बंधन कमी. म्हणून वाङ्मय ही कला सर्वांत श्रेष्ठ. अशी ही श्रेष्ठ कला शब्दावर आधारलेली आहे. म्हणून शब्दशास्त्राचा अभ्यास हा वाङ्मयाचा पायाच होय.''—व्युत्पत्ति-शास्त्राचा किंवा भाषाशास्त्राचा साहित्याशीं काय संबंध ह्या शंकेची निवृत्ति अशा रीतीनें पांच वर्षांपूर्वींच प्रा. कुलकर्णी ह्यांनीं स्वतःच करून ठेवलेली आहे.

### आधुनिक निघंटुकाराचें कलारसिक हृदय

तथापि, प्रत्यक्ष वाङ्मयनिर्मितीच्या दृष्टीनें प्रा. कुलकर्णी ह्यांनीं काय कामगिरी केली आहे, हा प्रश्न अखेर शिल्लक राहतोच. साहित्याचे वाचक म्हणतील: ''तुम्ही म्हणतां तें आम्हांला मान्य आहे. प्रा. कुलकर्णी हे एक महान् भाषाशास्त्रज्ञ आहेत, निरुक्तकार आहेत, विद्वान् इतिहाससंशोधक आहेत, हें आम्हीं कबूल करतों. पण ज्या वाङ्मय-कलेच्या सर्वश्रेष्ठतेची त्यांनीं एवढी प्रशंसा केलेली आहे त्या वाङ्मय कलेची प्रत्यक्ष अशी त्यांनीं कोणती उपासना केलेली आहे, तें आम्हांला आधीं सांगा. '' वाचकांच्या ह्या जिज्ञासेचें त्यांच्या अपेक्षे-पेक्षां अधिक समाधान करण्याएवढी त्याहि क्षेत्रांत प्रा. कुलकर्णी ह्यांनीं कामगिरी करून ठेवलेली आहे. अर्थात्, ते वाच्यार्थानें कवि नाहींत, कादंबरीकार नाहींत किंवा नाटककार नाहींत. पण काव्य, कथा आणि नाटक ह्या वाङ्मयाचे एक










## कृष्णाजी पांडुरंग

प्रतिभाशाली टीकाकार ह्या दृष्टीनें मराठी साहित्यांत त्यांचें स्वतंत्र स्थान आहे यांत कांहीं शंका नाहीं. थोर टीकाकाराला लागणाऱ्या विधायक प्रतिभेचें आणि रसिकतेचें फार मोठें भांडवल प्रा. कुलकर्णी ह्यांच्याजवळ आहे. त्यांच्या प्रत्यक्ष परिचयाची किंवा सहवासाची संधि ज्यांना लाभली आहे, त्यांना त्यांच्या कोमल आणि रसिक हृदयाची कल्पना येईल. व्याकरणाचे आणि व्युत्पत्तीचे एखाद्या पाथरवटाप्रमाणें जन्मभर दगड फोडीत बसलेल्या या आधुनिक निघंटुकाराचें हृदय पाहावें तर तें नवनीतापेक्षांहि अत्यंत मृदु आणि सजल ! नात्याच्या, ऋणानुबंधाच्या आणि सहानुभूतीच्या असंख्य बिसतंतूंनीं जीवनाशीं आणि कर्तव्याशीं जखडला गेलेला एवढा हळवा आणि मायाळू विद्वान् सध्यांच्या जगांत आढळून येणें तर फारच कठीण आहे ! अष्टौप्रहर त्यांचें हृदय भावनेनें अक्षरशः ओथंबलेलें सांपडेल. त्यामुळें शास्त्रीय विषयावरील त्यांच्या सर्व लेखनांत किंवा भाषणांत एखाद्या कवीचें किंवा नाटककाराचें लालित्य आणि आवेश पाहावयाला मिळतो. विशेषतः त्यांच्या वक्तृत्वांत तर हा अभिनिवेश कित्येक वेळां अनावरच झालेला दिसून येतो. संस्कृत आणि मराठी भाषेचें अध्यापन करण्यांत तर त्यांचा जन्म गेला. त्यामुळें त्या भाषेमधील प्राचीन आणि अर्वाचीन वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग केवढा गहन आणि मार्मिक असेल, हें सांगण्याचीहि आवश्यकता नाहीं. वाङ्मयासंबंधीं त्यांनीं कांहीं सिद्धान्त आणि उपपत्ती स्वतंत्र प्रज्ञेनें बसविलेल्या आहेत. माझ्या ' समीक्षक ' मासिकांत ' धन्वंतरी ' ह्या टोपण नांवानें जवळजवळ दोन वर्षेंपर्यंत ते मराठी साहित्य आणि साहित्यकार ह्यांजवर चरित्रात्मक आणि विवेचनात्मक समीक्षण लिहीत होते. हे सर्व लेख पुस्तकरूपानें जेव्हां प्रसिद्ध होतील, तेव्हां मराठी वाङ्मयाच्या टीकाशास्त्रांत प्रा. कुलकर्णी ह्यांनीं केवढी मौलिक भर घातली आहे, तें साहित्याच्या अभ्यासकांना कळून येईल.

### साहित्यशास्त्रांतील प्रश्नांवर मौलिक विचार

छत्तीस सालीं पुण्याच्या शारदोपासकांच्या संमेलनामध्यें आपल्या अध्यक्षीय भाषणामधून काव्यानंदाची एक अभिनव उपपत्ति त्यांनीं मांडलेली सुप्रसिद्धच आहे. कलाकृतीपासून प्राप्त होणाऱ्या आनंदाचें विश्लेषण करतांना त्या भाषणांत ते म्हणाले : " भाषा ही प्रेममूलक गायनापासून उत्पन्न झाली, असा एक सिद्धान्त आहे. प्रत्येक प्राण्याच्या आयुष्यांत एक उन्मादाची अवस्था येते. ह्या उन्मादावस्थेमध्यें त्याच्या जीवनांत निसर्गतःच सौंदर्य आणि कला प्रकट होतात. अशा अवस्थेंत अनुनयाचें साधन म्हणून भाषा प्रकट झाली. आतां वाङ्मय हा जर भाषेचा विलास आहे तर तोहि मनुष्याच्या उन्मादावस्थेंतच निर्माण व्हावा हें साहजिक आहे. क्रौंचमिथुनाच्या हिंसेंतून निर्माण झालेल्या शोकामुळें आदिकाव्य निर्माण झालें ही कल्पनाच मुळीं पटत नाहीं. शोकाचा श्लोक होणें अशक्य आहे. प्रेमाच्या किंवा शृंगाराच्या उन्मादावस्थेंतच कला आणि वाङ्मय ह्यांचा उगम सांपडूं शकेल. शृंगाराला रसाचा राजा म्हणतात तें काय उगाच ? आधुनिक मानसशास्त्रीय संशोधनाचाहि ह्या सिद्धांताला पाठिंबा आहे ". कलेची आणि काव्याची उत्पत्ति कशी होते हें सांगितल्यानंतर, आपणांला ह्या कलेपासून किंवा काव्यापासून आनंद कसा होतो हा प्रश्न साहजिकच पुढें उभा राहतो. बडोद्याच्या साहित्य-संमेलनांत तात्यासाहेब केळकरांनीं ' सविकल्प समाधी 'ची आपली उपपत्ति मांडली हें प्रसिद्धच आहे. वामनराव जोशी ह्या मनःस्थितीला ' सहानुभूतिपूर्वक ताटस्थ्य ' किंवा ' स्वायत्त तादात्म्य ' म्हणत. प्रा. फडके ह्यांनीं तिला ' पुनःप्रत्यय ' असें नांव दिलें आहे. प्रा. कुलकर्णी ह्यांच्या मतें, ज्ञानानंद, कलानंद किंवा काव्यानंद हे सर्व प्रत्यभिज्ञाजागृतीनें आपणांस होतात. प्रत्यभिज्ञा म्हणजे तद्रूपता; ' तो मी आहे किंवा ती माझी भावना आहे ' असें वाटणें. शकुंतलेला बघून दुष्यंत हर्षित झाल्यानंतर आपणहि हर्षित होतों. शकुंतलेची प्रेमपत्रिका बघून आपणाला आपल्या प्रेमपत्रिकेची आठवण होते. कण्व शकुंतलेची सासरीं पाठवणी करतांना आपल्या डोळ्यांत पाणी येतें. अमुक एका नाटकांतील








नायक मीच किंवा नायिका मीच असें आपणांस कां वाटतें ? त्या त्या प्रसंगांशीं, पात्रांशीं किंवा त्यांच्या भावनांशीं आपण तादात्म्य पावून पुन्हां तटस्थ राहतों म्हणून नव्हे किंवा विकल्प कायम ठेवून आपली त्यांच्याशीं समाधि लागते म्हणून नव्हे, तर आपल्या आयुष्यांतले ते ते अनुभव जागृत होतात म्हणून आपल्याला आनंद होतो. ह्या अवस्थेंत स्वत्व आणि परत्व ह्या दोहोंचीहि जाणीव कायम असते.

मराठी साहित्याच्या भाष्यकारांमध्यें जीवनवाद आणि कलावाद असे जे दोन पक्ष उत्पन्न झालेले आहेत त्यांमध्यें प्रा. कुलकर्णी ह्यांचा अंतर्भाव कोठें होतो, ह्याचें विवेचन करणें मोठें उद्बोधक होईल. जीवनवादाचा अर्थ जर कोणी उपयुक्ततावाद असा करील, तर प्रा. कुळकर्णी ह्यांना तो मान्य नाहीं. वाङ्मय हें वर्गकलहानें उत्पन्न होतें किंवा वाङ्मयानें एका विशिष्ट प्रकारचेंच समाजजीवन चित्रित केलें पाहिजे हें म्हणणें त्यांना कबूल नाहीं. जीवनवादाचा अतिरेक वाङ्मयांतील आदर्शवत्ता ( Romanticism ) बाजूला सारून वास्तवतेला अवास्तव महत्त्व देण्यांत पुष्कळसा होतो. त्याला प्रा. कुळकर्णी ह्यांचा विरोध आहे. ह्यासंबंधीं विवेचन करतांना एका ठिकाणीं ते म्हणतात : “ वास्तवतेच्या प्रकटीकरणाला समाजशास्त्राचें रूप देण्याचा जो कित्येकांनीं प्रयत्न चालविलेला आहे तो बरोबर नाहीं. वाङ्मयविलास हा प्रतिभेचा खेळ आहे, आंकड्यांचा नव्हे. तें भावनांचें शास्त्र आहे, मोजदादीचें नव्हे. वाङ्मयानंदानें किती जणांचें किती सुख साधलें, समाजजीवन किती सुधारलें, भांडवलशाही किंवा जमीनदारी किती टक्के कमी झाली असा उपयुक्ततावाद्यांना निष्कर्ष काढतां येईल काय ? ” केवळ कलेसाठीं कला हा कलावाद्यांचा कलेकडे बघण्याचा मर्यादित दृष्टिकोणहि प्रा. कुलकर्णी ह्यांना मंजूर नाहीं. कलावादी लोक केवळ तंत्राकडे लक्ष देतात अन् जीवनाकडे दुर्लक्ष करतात हें त्यांना पसंत नाहीं. ते म्हणतात : “ प्रतिभासंपन्न लेखकांनीं मानवी जीवनांतलीं, निरनिराळ्या प्रकारच्या व्यवहारांत पडून, आपल्या अनुभूतीचीं केंद्रें वाढविलीं पाहिजेत. जीवनाच्या विविधतेचें प्रतिबिंब वाङ्मयावर पडलें पाहिजे. स्वभावदर्शन, भावना-दर्शन, विकार-विचार-प्रकटीकरण ह्यांचे निरनिराळे नमुने आपल्या वाङ्मयामधून त्यांनीं मांडले पाहिजेत. ” कलेचें ध्येय आनंदप्राप्ति असावी असें त्यांचें म्हणणें आहे. तथापि, केवळ आनंदासाठीं ही आनंदप्राप्ति व्हावी ही त्यांची भूमिका नाहीं. ते म्हणतात: “ कलेमधील सौन्दर्याची हांक मनुष्याच्या अंतरात्म्याला जेव्हां पोहोंचते तेव्हां त्याला कलानंद प्राप्त होतो. हा कलानंद प्राप्त झाल्यानेंच भावनांवरील मालिन्य नाहींसें होतें. या कलानंदानेंच भावनांचें शुद्धीकरण आणि दैवीकरण होतें. ह्या कलानंदानेंच मानवांतील मानवत्व जागृत होतें आणि मानवाला अतिमानवत्वाची प्राप्ति होते. ” अशा रीतीनें प्रा. कुलकर्णी ह्यांचा वाङ्मयाकडे बघण्याचा दृष्टिकोन संपूर्णतया जीवनवादी किंवा कलावादीहि नाहीं. त्यांची भूमिका अध्यात्मवाद्याची आहे, असें म्हटलें तर तें जास्त सयुक्तिक होईल. त्यामुळें कित्येकांना ते सनातनी वाटण्याचा संभव आहे. म्हणून त्याबरोबर हेंहि सांगून टाकलें पाहिजे कीं, मार्क्स-वाद्यांच्याहि चार पावलें पुढें जाऊन वाङ्मयाचें संयोजन केलें पाहिजे असें ते आग्रहानें प्रतिपादीत असतात. पण अर्थातच त्यांची संयोजनाची कल्पना निराळी आहे. ते म्हणतात : “ मानवामधील हें अतिमानवत्व अथवा देवत्व त्याला प्राप्त करून देण्यासाठीं वाङ्मयीन संयोजन आवश्यक आहे. प्रतिभावन्त साहित्यिकांच्या प्रतिभेचे प्रवाह अशा विशिष्ट कुल्यां-( कालव्या )-मधूनच वाहवायला लावले पाहिजेत. राष्ट्रांमध्यें या प्रतिभेच्या कुल्या ठिकठिकाणीं पसरून त्या कुल्यांतील प्रतिभेच्या जलानें राष्ट्रांतील जनतेच्या भावनांची भूमि सद्भावनांनीं, सद्विचारांनीं, सत्प्रवृत्तींनीं, अंकुरित, पल्लवित, पुष्पित आणि फलित करून सोडावयाची आहे. ह्यालाच मी वाङ्मयीन संयोजन म्हणतों. ” साहित्यशास्त्राचा एवढा मौलिक विचार ज्यानें केला आहे, तो केवळ व्युत्पत्तिकार आणि वैया-करण आहे म्हणून वाङ्मयाशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं असें समजणें किती कोतेपणाचें आहे हें यावरून कळून येईल.

**लेखनशैलींतील कलात्मता आणि प्रसाद**

तथापि, प्रा. कुलकर्णी ह्यांची लेखनैशली पाहिली म्हणजे साहित्याशीं आणि लालित्याशीं त्यांचा किती निकट संबंध आहे हें कळून आल्यावांचून राहणार नाहीं. एखाद्या कवीच्या काव्यांत जो प्रसाद आढळणार नाहीं किंवा कथालेखकाच्या लेखनांत जी कलात्मता दिसून येणार नाहीं, ती पदोपदीं तुम्हांला त्यांच्या लेखनांत पाहावयाला मिळेल. जन्मभर व्याकरणाचा नि व्युत्पत्तीचा अभ्यास करूनहि त्यांच्या विचारांत किंवा लेखनांत क्लिष्टता, कर्कशता किंवा जाड्य हे दोष औषधापुरतेहि सांपडणार नाहींत! किंबहुना, त्यांच्या लेखनांतला बाळबोध जिव्हाळा आणि आटोपशीरपणा कित्येकदां सानेगुरुजींची आठवण करून देईल असा आहे, असें म्हटलें तर त्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. जसा रस आणि अर्थ असेल तशी त्यांच्या वाक्यांची लांबी आणि गति बदलत जाते. विनोद, उपरोध किंवा त्वेष ह्या भावना ते अशा कौशल्यानें आणि आवेगानें व्यक्त करतात कीं, आपण पाहतच राहतों! त्यांच्या लेखनशैलीचे प्रत्यक्ष नमुने दिल्याखेरीज मी काय म्हणतों तें वाचकांना पटणार नाहीं. ज्ञानेश्वरावरील लेखाचा त्यांचा हा समारोप पाहा :

" ज्ञानेश्वराचे ग्रंथ म्हणजे खाणी आहेत. त्यांतून अनेक अमोल रत्नें बाहेर पडतात. असें हें काव्याचें, ज्ञानाचें आणि वेदान्ताचें भांडार ज्ञानेश्वरांनीं उघडलें. लोकांना काव्य तर दिलेंच, पण त्याबरोबर ज्ञानहि दिलें. परब्रह्मसुख दिलें. काव्यानंद व ब्रह्मानंद असे दोन्हीहि दिले. भाग्य मराठी भाषेचें कीं त्या आरंभाच्या काळीं ज्ञानेश्वरासारखा प्रज्ञावन्त व प्रतिभावन्त साधुसंत मिळाला, ज्ञानेश्वरीसारखें सामर्थ्याचें अधिष्ठान मराठी वाङ्मयास मिळालें. ह्यामुळेंच पुढचें वाङ्मयहि तेजस्वी झालें. सर्व जगांतल्या वाङ्मयांत अत्यंत प्रासादिक व रसाळ ठरणारा ज्ञानेश्वरी हा ग्रंथ एकदां तरी वाचा. वेळ नसेल तर कलश अध्याय जो अठरावा अध्याय तो तरी वाचा. तितकाहि वेळ नसेल, तर एखादा लहान पंधरावा, निदान अकरावा अध्याय वाचा. तेंहि नाहीं साधलें, तर अध्यायाच्या आरंभींचें नमन तरी वाचा. म्हणजे त्यांत काय मजा आहे ती कळेल. संसारांतील तापानें गांजलेल्या मनाला समाधान मिळेल; जीवनांत शांति मिळेल. परब्रह्माची अंधुक का होईना पण कल्पना येईल!" ही भाषाशास्त्र्याची लेखनशैली आहे का एखाद्या प्रतिभाशाली ललित लेखकाची लेखनशैली आहे ह्याचा कोणीहि विचार करावा. त्यांच्या ऐतिहासिक लेखनांतला हा एक वैशिष्ट्यपूर्ण उतारा बघा : " संभाजी व राजाराम ह्यांची दुसरी पिढी. ह्यांच्यामध्यें मूळ अर्जकाचे गुण पुरेपूर होते. धर्मभावनेचा विद्युत्-प्रवाह सारखा रोमरन्ध्रीं खेळत होता. इतका कीं, त्याची सीमा त्या त्या व्यक्तीच्या प्राणांचा होम करण्यापर्यंत गेली. सर्व राष्ट्रच त्या वेळीं ह्या धर्मप्रतिष्ठेच्या भावनेनें विद्युत्-चलित झाल्यासारखें झालें होतें. एवढा मोठा प्रचंड महंमदी सेनासागर सर्व महाराष्ट्रभर खळवळून उठला असतां, मनूच्या नौकेसारखी किंवा नोहाच्या आर्कप्रमाणें मराठी राज्याची ही नौका बेसुमार हेलकावे खात खात जी पैलतीराला पोहोंचली ती ह्या धर्माभिमानाच्या जोरावर. समुद्राच्या ह्या अजस्र हेलकाव्यांत कधीं रायगडच्या माथ्यावर, तर कधीं अजिंक्यताऱ्याच्या माथ्यावर, तर कधीं जिंजीच्या किल्ल्यांत, अशा रीतीनें त्या नौकेला मुक्काम करावा लागला. कधीं औरंगजेबाचा क्रोध तर कधीं झुलपिकारखानाचा जोर, कधीं तुळापुरची हत्या, तर कधीं सूर्याजी पिसाळाचा फितूर तर कधीं अजिंक्यताऱ्याचा उच्छेद, तर कधीं जिंजीची उपासमार अशा बिकट प्रसंगांतून ही जी नौका निभावली व जी सुरक्षित रीतीनें त्या त्या काळच्या कर्णधारांनीं वल्हवली ती ह्या धर्मप्रतिष्ठेच्या तेजाच्या दीपस्तंभाकडे बघूनच!" ह्या लेखनांतली कल्पनेची भव्यता आणि भरारी एखाद्या ऐतिहासिक नाटककाराला साजेल अशीच नाहीं काय?—प्रा. दत्तोपंत पोतदारांचें त्यांनीं रेखाटलेलें शब्दचित्र एखाद्या नाणावलेल्या व्यंगचित्रकारालासुद्धां रेखाटतां यावयाचें नाहीं इतकें तें सुंदर आणि हृदयस्पर्शी आहे! नामदेवाच्या गाथ्यांतील एका अभंगाचा अडलेला अर्थ विचारावयाला प्रा. कुलकर्णी एकदां पोतदारांकडे








गेले. त्याच प्रसंगाची मनोरंजक हकीगत वर्णन करतांना ते लिहितात : "त्यांच्या कचेरींतच त्यांची गांठ घेतली. जिकडे तिकडे फायली पडलेल्या. दर पांच मिनिटांनीं तेथें कोणी तरी येई आणि त्याच्या कामाचा लगेच निर्गम होई. पत्रव्यवहार वाच, उत्तरें लिही, नोटीस काढ, शिक्षकांना सूचना दे, माळ्याला काम सांग, लहान लहान अर्भकांच्या तक्रारी ऐक, त्यांचा निकाल कर, असा प्रकार एकसारखा चालला होता. मी आपला तास गेला, दोन तास गेले, बसलेला! माझी गाथा तेथेंच आणि अभंगहि तेथेंच ! मध्यम उंच अशी हडकुळी मूर्ति. लांबट दुभागी डोकें. त्यावर चंदनचर्चेचे पुसट पुसट पट्टे मधून मधून डोकावत आहेत. कपाळावर लांब आडवें गंध. गळ्याभोंवतीं पट्टीबंद उपरणें. लांब शेरवाणीवजा कोट. मध्येंच एकदां पैशाचा प्रश्न निघतांच दत्तोपंतांनीं आपल्या नेसल्या धोतराच्या पुढल्या निऱ्यांत चापून ठेवलेली कसावजा एक पिशवी काढून तिच्यांतून पैसे उचलून देतांना पाहिल्यावर तर मी विशेषच गार झालों !" हें शब्दचित्र वाचून दत्तोपंतांची मूर्ति ज्याच्या डोळ्यांसमोर उभी राहणार नाहीं आणि त्यामुळें ज्याच्या ओठांवर कौतुकयुक्त स्मित झळकणार नाहीं, असा अरसिक माणूस ह्या महाराष्ट्रांत कोणी असूं शकेल काय ?

## विनोदी लेखनाचा एक नमुना

आतां प्रा. कुलकर्णी ह्यांच्या विनोदी लेखनशैलीचा एक नमुना देतों. पुण्याच्या वसंत-व्याख्यानमालेमध्यें कांहीं वर्षांपूर्वीं म्हाताऱ्या उपवक्त्यांनीं भारी उच्छाद मांडला होता. त्यावर ' समीक्षकां'त टीका करतांना त्यांनीं लिहिलें होतें : " वसंत-व्याख्यानमालेंतील उपवक्ते बोलायला कां उठतात ? तर कांहीं तरीं बोलायला हवें म्हणून ! बरे उठतात तरी कोण ? तर कांहीं म्हातारे ! आणि बोलतात तरी कसे ? तर अगदीं शुद्ध चेवल्यासारखे. विषय कोणीकडे, वक्त्याचें प्रतिपादन कोणीकडे व ह्या म्हाताऱ्या उपवक्त्यांचें ध्यान कोणीकडे ! व्यासपीठावर चढवत नाहीं. त्याच्या पायऱ्या दिसत नाहींत. ऐकूं येण्यासारखा आवाज तोंडांतून निघत नाहीं. मान हलते. डोळे दिपतात. हातपाय कांपतात. ही अशी त्यांची अवस्था ! ह्यांच्यावर जुलूम का कोणी केला आहे ? पण नाहीं ! विषय कोणता का असेना, आम्ही बोलणारच. पूर्वीं एक असेच लोचट उपवक्ते होते. ते प्रत्येक वेळीं उठायचेच. एखादे वेळीं जर ते उठले नाहींत तर लोक त्यांना 'अहो म. गो., उठा' अशा हांका देऊन उठवत. आतां ते ' म. गो.' गेले आणि 'कृ. गो.' आले ! विषय साहित्य असो, शृंगार असो, महाराष्ट्र-विद्यापीठ असो, वर्तमानपत्रें असो, बृहन्महाराष्ट्र असो, हे म्हातारे आपले बोलण्यास सरसावून तयार. बोलतात काय तर शुद्ध जल्पट ! विचार अगोदरच कांहीं नसतात. असलेच तर ते बुरसलेले आणि चेवलेले. तेव्हां आमची चालकांना सूचना आहे कीं, ह्या म्हाताऱ्यांचा बकवा बंद करा आणि विषयांचा परिष्कार चांगला होईल असें वातावरण निर्माण करा. "

प्रा. कुलकर्णी ह्यांच्या लेखनशैलीचे एवढे नमुने पुरे झाले. खरें सांगायचें म्हणजे भाषेचें आणि साहित्याचें असें कोणतेंहि एक क्षेत्र नाहीं कीं ज्यांत प्रभावानें संचार करण्याचें सामर्थ्य प्रा. कुलकर्णी ह्यांच्या प्रतिभेंत नाहीं. काव्यें, कथा किंवा नाटकें त्यांनीं लिहिलीं नाहींत इतकेंच. मानसशास्त्राच्या आणि शिक्षणशास्त्राच्या अभ्यासानें कोणत्याहि गहन विषयाचें प्रतिपादन श्रोत्यांच्या आणि वाचकांच्या दृष्टीनें सुबोध आणि आकर्षक कसें करावें ही कला त्यांना उत्तम साधलेली आहे. शास्त्र आणि भावना, पांडित्य आणि लालित्य, गांभीर्य आणि जिव्हाळा ह्यांचा अत्यंत हृदयस्पर्शी समन्वय प्रा. कुलकर्णी ह्यांच्या व्यक्तिमत्त्वांत झालेला आढळून येईल. हृदय शाबूत ठेवून ज्ञानाची उपासना करणारा एक प्रतिभाशाली विद्वान् असें त्यांचें थोडक्यांत वर्णन करतां येईल.

## विशाल वाचन व विलक्षण स्मरणशक्ति

प्रा. कुलकर्णी ह्यांच्या प्रचंड लेखनप्रपंचाचा एवढ्याशा मर्यादेंत समाचार घेणें अशक्य आहे. किती ठिकाणीं आणि किती विषयांवर तरी त्यांनीं लिहिलेलें आहे ! त्यांचा एकेक निबंध म्हणजे स्वतंत्र प्रबंधच ठरेल ! मग तो दहा पानांचा असो, नाहीं तर शंभर पानाचा असो. त्यांचें प्रत्येक लेखन



अनुक्रमणिका






म्हणजेच एक संशोधन होय. त्याजवरून नुसती नजर फिरविली तरी कित्येक वर्षांच्या परिश्रमाचा आणि अविश्रान्त अभ्यासाचा तो परिपाक आहे हें चटकन् लक्षांत येतें आणि छाती फाटते. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेसाठीं कोंकणी आणि अहिराणी भाषेवरचा त्यांनीं जो अहवाल प्रसिद्ध केलेला आहे तें एक राष्ट्रीय महत्त्वाचें संशोधन आहे. ह्या दोन्ही भाषा स्वतंत्र भाषा नसून मराठीच्याच उपभाषा आहेत, असें त्यांनीं ह्या अहवालांत सिद्ध केलें आहे. 'विक्रम-स्मृति' ग्रंथांत 'विक्रम-कथा' म्हणून पंचवीसच पानांचा त्यांनीं एक निबंध लिहिला आहे, पण त्यांत दीड-हजार वर्षांतील संस्कृत, प्राकृत, अन् मराठी ह्या भाषांतील कथावाङ्मयाचा त्यांनीं तपशीलवार आढावा घेतलेला आहे. 'महाभारत', 'बृहत्कथासागर', 'वेताळपंचविशी', 'सिंहासन-बत्तीशी', 'शनिमाहात्म्य' ह्या ग्रंथांमधील जानपद वाङ्मयाचें त्यांनीं वैचारिक आणि ऐतिहासिक दृष्ट्या विश्लेषण केलें आहे. 'धातुरूपकोश' ची किंवा 'व्युत्पत्तिकोश'ची त्यांची प्रस्तावना वाचली म्हणजे तर त्यांच्या विद्वत्तेचें आणि व्यासंगाचें अवाढव्य स्वरूप बघून बुद्धि स्तिमितच होते. वेद, वेदांगें, ब्राह्मणें, आरण्यकें, प्रातिशाख्यें, शिक्षा, निरुक्त, निघंटु, भाष्यें, धातुपाठ ह्यांचा एवढा व्यासंग करायला त्यांना वेळ तरी कधीं मिळाला? पाणिनि, पतंजलि, कात्यायन, चंड, वररुचि, सायण, दुर्ग ह्यांच्या ग्रंथांचें एवढें परिशीलन ह्यांनीं केलें तरी केव्हां? भांडारकरांवरील लहानशा लेखांत प्राच्यविद्येचें संशोधन करणाऱ्या सर्व पाश्चात्त्य पंडितांचा त्यांनीं जो परामर्श घेतला आहे तो बघून त्यांच्या वाचनाच्या सीमा तरी कोठपर्यंत पसरल्या आहेत, ह्याचें वाचकांना कोडें पडल्यावांचून राहत नाहीं. वैदिक कोश रचणारे रोथ-बोटलिंग काय, पाणिनीच्या व्याकरणाची विचिकित्सा करणारे गोल्डस्टूकर काय, काठकधर्म-सूत्राचा अभ्यास करणारे डॉ. बूल्हर काय—नुसतीं हीं नांवें वाचूनच सामान्य वाचक जागच्या जागीं थंडा पडतो! गौडी वाङ्मयाचा संशोधक बीम्स, गुजराती भाषेचा टेसिटोरी, द्राविडी भाषेचा काल्डवेल, कानडी भाषेचा गुण्डेर्ट आणि किटेल, मराठी भाषेचा ब्लोक—हीं नांवें तर प्रा. कुलकर्णी ह्यांच्या नुसतीं जिव्हाग्रीं खेळत असतात. मराठी भाषेच्या सर्वसामान्य प्राध्यापकांची तर गोष्टच सोडून द्या, पण संस्कृत भाषेच्या मोठमोठ्या प्राध्यापकांपैकीं फारच थोड्यांची व्युत्पत्ति आणि व्याकरण ह्या विषयावर प्रा. कुलकर्ण्यांएवढी तयारी असेल. भाषाविषयच नव्हे, तर इतिहास आणि साहित्य या विषयांवरील त्यांचें कोणतेंहि लेखन घेतलें, तरी त्यामध्यें व्यक्तींच्या आणि ग्रंथांच्या संदर्भनांवांच्या राशींच्या राशी इतस्ततः विखुरलेल्या आढळून येतील! वेदांतील सुदास, तृत्सु, ब्राह्मण ग्रंथांतील सरमा, शुनःशेप, उप-निषदांतील श्वेतकेतु, वाचक्नवी येथपासून त्यांच्या संदर्भांना जी सुरुवात होते ती मराठ्यांच्या इतिहासांतील विरुबाई, भिवाजी कासुरडे, गणेशपंत पिटके, रघुनाथराव चिनापट्टणकर आणि मोर-दीक्षित मराठे असल्या फडतूस व्यक्तींच्या उल्लेखा-पर्यंत जाऊन थडकते! त्यांच्या दृष्टिक्षेपांतून कांहीं कांहीं सुटत नाहीं. महदंबेचे ढवळे, ऋद्धि-पूरचा गुंडम् राऊळ येथपासून तों सगुणाबाईचें हस्तलेखसंग्रहालय आणि शरभोजी भोसल्यांचें ग्रंथालय येथपर्यंत सर्व वाङ्मयीन व्यक्तींचें नि वस्तूंचें ते मोठ्या मिटक्या मारीत वर्णन करतात! त्यांच्या विशाल वाचनाचें आणि विलक्षण स्मरण-शक्तीचें जेवढें कौतुक करावें तेवढें थोडें आहे.

### विद्या आणि विनय यांचा गोड समन्वय

एवढें असूनहि त्यांची विनीतवृत्ति एवढी थोर कीं, दीडशें वर्षांतील महाराष्ट्रामधल्या शंभर ग्रंथांची यादी जेव्हां त्यांनीं तयार केली तेव्हां ही यादी करणारे तुम्ही कोण असा जर आपणाला कुणीं प्रश्न केला तर त्याला "नाहीं, बाबा! आम्ही कोणी नाहीं. सहज आपली निवड केली, इतकेंच!" एवढेंच आपल्याजवळ उत्तर आहे, असें ते भीत भीत सांगतात. विद्या आणि विनय ह्यांच्या समन्वयाचें असें आल्हादकारक उदाहरण आम्हांला तरी दुसरें माहीत नाहीं. आजहि ते महाराष्ट्राचा आद्यकवि जो मुकुंदराज त्याच्या 'विवेकसिंधु' ग्रंथाचें संशोधन करण्याच्या कार्यामध्यें अष्टौप्रहर गढलेले आहेत. चाळीस पोथ्या जमवून त्यामधल्या पाठांची








ते चिकित्सा करीत आहेत. सेवानिवृत्त झाल्यानंतरहि त्यांच्या विद्याव्यासंगांत एका क्षणाचाहि खंड पडलेला नाहीं. ' मराठी भाषेच्या उद्‌गम आणि विकास ' प्रमाणेंच मराठी वाङ्मय आणि इतिहासाच्या उद्‌गम-आणि-विकासावर दोन प्रचंड ग्रंथ निर्माण करण्याची अद्याप त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. पण बाहेरच्या जगाला त्याची गंधवार्ताहि नाहीं. लोकांना वाटतें कीं, हा पेन्शनर मित्रमंडळीं-मध्यें चकाट्या पिटण्यांत, सांजसकाळ फिरावयाला जाण्यांत आणि मधूनमधून तंबाखू खाण्यांतच आपलें ऊर्वरित आयुष्य घालवितो आहे झालें !

खरोखर, भांडारकर, टिळक आणि राजवाडे ह्यांनीं विद्वत्तेच्या आणि संशोधनाच्या ज्या महान् परंपरा या राष्ट्रांत उत्पन्न करून ठेवल्या आहेत त्यांची बूज महाराष्ट्रांत आज ज्यांनीं कोणीं राखली आहे त्यांच्या यादींत प्रा. कुलकर्णी ह्यांचा निःसंशय समावेश करावा लागेल. विद्याव्यासंगांत आणि ज्ञानोपासनेंत ज्यांनीं आपली सर्व हयात खर्च केली अशा एका महान् संशोधकाला आणि भाषापंडिताला साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षस्थानीं निवडून आपण त्यांचा मोठा गौरव केला असें ज्यांना वाटत असेल, त्यांच्या अज्ञानाची जेवढी कींव करावी तेवढी थोडीच आहे. किंबहुना, इतक्या उशीरा का होईना पण साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षस्थानीं त्यांची योजना करून महाराष्ट्रांतल्या साहित्यप्रेमी जनतेनें ह्या महनीय संस्थेची प्रतिष्ठाच वाढविली आहे असें निदान माझें तरी प्रांजल मत आहे. मग इतरांना काय वाटत असेल तें वाटो !

---

## तापी, तुझ्या तीरावर—

**— १ —**

पलीकडे थडकली
कुणी भाग्यवंत एक
रक्षा सांठवून त्याची
दूर दूर वाहवून

धाम त्याचें होतें कुठें
कोठुनिया कोणीकडे
दिलें दान घेतलें वा
परतची फेड केली

जाणाऱ्या या राखेसंगें
माझ्या मनाच्या माहेरा
देवी, माझ्या मनांतलें
शब्द ओठांत थांबती

तुझ्या जळाचें स्पर्शन
तुझी वाहणारी वाट

चिता तुझ्या कांठावर
लागलासे मार्गावर
तुझ्या जलाच्या मेण्यांत
नेशिल तूं सागरांत.

देवी ठावें कां तुजला
त्याचा मार्ग बदलला ?
निर्दय या निसर्गानें
कृतज्ञ या मानवानें.

किंवा पाठवूं निरोप
येते मनांतून खूप.
गूज तुला सांगतांना
आज निरोप देतांना

व्हावें अमृताच्या परी
नेवो त्याला पैलतीरीं.

**— २ —**

बुडवितों कमंडलू
पुढलिया प्रवासाची
जळांतल्या अमृताची
पुरायचें मार्गावर

दुपारचें ऊन तापें
चिटपांखरू न कोणी
तीराकडे आळसांत
तळपतें पाणी, उरे

वाळवंटीं मृगजल
हात उभारून मीहि
कोण फसणार ? साऱ्या
खुळ्या कल्पनांचा मेळा

मुशाफिरी जीवनाची
कधीं ऊन, कधीं छाया

घेतों जल भरुनिया
सांठवण करुनिया
ओघ, जन्माचीच साथ
माझ्या मनांतले हेत

शुकशुकाट जहालें
आतां पात्रांत राहिलें
सुस्तावत जाती लाटा
मात्र भीषण शांतता

फसायचे मृग कोणी
सांगतसे ओरडोनी
रीतभात कळतसे
मनीं माझ्या मात्र वसे.

मास—ऋतूंचा आवर्त
यांची अखंड संगत !

—गणेश कुडे



अनुक्रमणिका






# खानदेशांतील अहिराणी स्त्रीगीतें

अहिराणी ही खानदेशाची बोलभाषा. जळगांवच्या पुढें लेवे पाटलांची वस्ती लागते. त्यांची भाषा अहिराणीपेक्षां निराळी आहे. तिची आणि वऱ्हाडीची बरीच तोंडओळख. शिरपुरपासून तळोदें नंदुरबारकडे गुजर लोकांची वस्ती जास्त. त्यांच्या भाषेवर गुजरातीची छाप जास्त. ती भाषासुद्धां अहिराणीपेक्षां निराळी वाटते. अमळनेर तालुक्याचा भाग अहिराणीचें केंद्र म्हणून समजला जातो. अमळनेर तालुक्यांतील एका खेडेगांवांतील राहणारा म्हणूनहि या अहिराणी भाषेशीं माझा बराचसा संबंध आल्यामुळें त्या भाषेशीं माझी बरीच जानपछान आहे. अर्थात् बोलभाषेपलीकडे मला अहिराणीविषयीं जास्त माहिती नाहीं. अहिराणी ही अडाणी अशिक्षितांची भाषा समजली जाते. आणि ही शिष्टमान्य भाषा नसल्यानें तींत वाङ्मयनिर्मिति होणें देखील दूरापास्तच.

एक गोष्ट मात्र खरी कीं, पहांटेच्या वेळीं खेड्यापाड्यांतून जात्यावर म्हटल्या जाणाऱ्या ओव्यांची संख्या अमाप आहे. सणासुदीला चारचौघीजणी एकत्र जमल्या म्हणजे राम-कृष्ण यांचें कीर्तिसंगीत ऐकत ऐकत कोणाचेंहि देहभान हरपून जावें इतकें तें गोड असतें. सीता-रुख्माबाईच्या, द्रौपदी-पांडवांच्या, शेजीबाईला उद्देशून, तुळशीबाईच्या बंगल्यांतील दीपाच्या तेजांत, गीत गात गात नतमस्तक झालेल्या, तान्ह्याच्या इवल्या जगालाच आपल्या गीतांतून सारसर्वस्वाचा महिमा चढविणाऱ्या, भाऊ-भावजयींच्या चेष्टालापगीतांत दुपारची रिकामी वेळ घालविणाऱ्या, करमेनासें झालें म्हणजे निसण्या-टिपण्याच्या वेळीं बुलाबाईचीं भावगीतें आळविणाऱ्या, निसून-टिपून झाल्यावर लगेच पाळ्यांच्या बाजूला आळीपाळीनें मुलाला मांडीचें उसें देऊन ओव्या म्हणणाऱ्या—अशा किती तरी स्त्रिया खेड्यांत पाहायला मिळतात.

जातें—आमच्याकडे त्याला 'घट्या' म्हणतात—हें कुणबी स्त्रियांचें दैवत असतें. त्यांचें दळण चक्कीवर जाणार नाहीं. त्यांच्या घरीं गेलों म्हणजे मला त्यांचा तो 'घट्या' पाहायाला मिळतो. घरांत उखळाजवळ त्याची जागा असते. उखळाची जागा आणि पीठ घसरणाऱ्या पाळ्यांची जागा पांढऱ्या मातीनें सारविलेली असते. असल्या या जात्यांच्या पाळ्यावर त्या कुणाला बसूं देणार नाहींत. इतर घर शेणानें सारविलेलें असतें. आणि शेण पावसाळ्यांतील असल्यास त्याच्या हिरवट रंगानें त्यांतील अंतर ताबडतोब लक्षांत येतें.

कुणबाऊ स्त्रियांना पावसाळ्याच्या दिवसांत खूप काम असतें. त्यामुळें त्या पहांटे ४-५ च्याच सुमाराला उठतात. त्यांच्या घरच्यांची तोंवर आंघोळ आटोपलेली असते. दळण झाल्यावर त्या विहिरीवर जाऊन धुऊन येतात, भाकऱ्या भाजून परत आपल्या नवऱ्याबरोबर शेतावर जातात आणि सायंकाळीं त्या शेतांतून परत येतांना दिसतात. कुणाच्या कडेवर मूल असेल, कुणाच्या डोक्यावर गवताचा भारा असेल. त्यांच्या कष्टाला पारावार नाहीं. हेंच त्यांचें रोजचें जीवन. उन्हाळ्यांत त्या रिकाम्या असतात, पण रिकाम्या मात्र सांपडणार नाहींत. त्या वेळीं पावसाळा येणार म्हणून धाबें सावरतील, ओटा लिंपून काढतील, भिंती सारवून काढतील. आरशासारखीं त्यांचीं घरें स्वच्छ असतात. खालीं बसलें तरी कपडे मळणार नाहींत. भिंती सारवून झाल्यावर त्या त्यांवर कुंकू लावतात. जणूं भिंती या देखील सवाष्णीच कुणी !

लहानसहान कुंकू लावणें स्वतः त्यांना आवडायचें नाहीं. चांगला रुपयाएवढा मळवट भरतील आणि अजूनहि, तोंड दिसणार नाहीं एवढा पदर तोंडावरून घेतील.

आपण चेष्टेंत जर म्हटलें, "काकू, कितला दिवस चाली हाई असं" तर त्या उलट उत्तर देतील, "तुम्हीं शिकेल लोकेस्नी सर्वा धरम बुडाई टाका."






अनुक्रमणिका





" तुम्हना घट्यावरना गाना आम्हले सांगस्यात का ? " असं विचारल्यावर त्या सांगणार नाहींत. त्या म्हणतील, " तुमले काय आवडाव शेत आम्हना येडा वाकडा गाना. " आणि मग दोनतीन जणी जमल्यावर त्याहि रंगतात.

परंतु त्यांच्या ओव्या विशेष रंगतात पहांटेच्या प्रसन्न वेळीं. आणि त्या वेळींदेखील जात्यांच्या घरघरींत त्यांच्या भावमधुर आवाजाचा गोडवा मिसळल्यावर त्या पवित्र नि गंभीर वातावरणांत मन भरून येतें. एकटीच असली तर लांबच लांब आवाजांत गात राहील आणि दोघी असल्या म्हणजे एकमेकी सुरांत सूर मिसळून म्हणण्याचा प्रयत्न करतील. या त्यांच्या जात्यावरच्या ओव्या प्रत्यक्ष ऐकल्याशिवाय त्यांची गोडीहि कळायची नाहीं. अहिराणीची ढब कळावी म्हणून हाताशीं आलेल्या ओव्यांतून कांहीं निवडक ओव्या जशाच्या तशा देत आहे. बहुश्रुत वाचकांना यांत आलेल्या ओव्यांतील विषयांचें साम्य दुसरीकडेहि आढळून आलेलें असेल.

**' पंढरपुरमां इठ्ठलनी जहागिरी '**

संतांनीं पावन झालेल्या या महाराष्ट्रांत पंढरीचें, पंढरीच्या विठू-रुखमाईचें महत्त्व घरोघर पोंचलेलें दिसेल. त्या विठुरायाच्या राज्याचें चित्र रेखाटण्याचा प्रयत्न पुढील ओव्यांत दिसून येईल :

योगे अठाइस
येना[1] आंघोळले
चंद्रभागाले उना[2]पूर
धाव धावरे इठ्ठल
पंढरपुरमां
देव इठ्ठलना
पंढरपुरमां
देव इठ्ठलनी
इठ्ठलना जोडे

इटवर उभा
पानी देस चंद्रभागा
दोन्ही थड्या झायात[3]एक
धारमान[4] पुंडलिक
माळणी ठमा-रमा
फुलेसना[5] पायजमा
माळनी धावा लेस[6]
फुलेसनी येळ जास
रुखामिनी बसेना

अबीर-बुक्कानी
पंढरपुरमां
देवरे इठ्ठल
पंढरपुरले
देवरे इठ्ठल
पंढरीले जाऊं
मन्हा[7] नमस्कार
शेर सोनानी
पंढरपुरमां
पंढरीले जाऊं
इठ्ठलनी रानी
पंढरपुरले
साधुना इनावर[8]
चंद्रभागाले उना पूर
रुखमाबाई म्हने
पंढरपुरमां
सोनानं ताकडं
पंढरपुरमां
रुखमाना चोईसाठे[9]
पंढरपुरनी वाट
मन्हा नमस्कार सांगा
पंढरपुरमां बाई
देव मन्हा इठ्ठलरे
आळंदीनी वाट
इंद्रायनीना कांठे
देव इठ्ठल म्हने
' कशी लऊ[16] काठी
देव इठ्ठल म्हने
' कशी लऊ पलंग
पंढरपुरमां
सोनानं बासिंग
दूरथून देखूं
सोनानी सुपली

इले गरदी सोसेना
टाळ-मुदुंगनं झाड
तुले भजननं येड
टाय-मुदुंगनी घाई
भजनले उभा राही
उभी राहूं पायरीले
रुखमाबाई सोयरीले
रुखमाबाईनी सरी
इठ्ठलनी जहागिरी
पंढरीले मन्हं कोन
मन्ही लागे गुरुबहिन
कथा व्हस घरोघरी
मैना बोले नानापरी
पानी लागन वडले
मन्हा पुंडलिक बुडे
देव इठ्ठल हलवाई
पेढा मोजे रुखमाबाई
कसानी रे लेवदेव
शिपी झाया नामदेव
जास[10] दामनगांवाले[11]
बोदल्या बवाले
पैसाले[12] माया[13] इस[14]
हात पुरेना खाले बस
जास देहूले वाकडी
तुका बांधस[15]झोपडी
'रुखमा, लय मन्ही काठी'
दारे साधुसनी[17]दाटी !'
'लय रुख्मा मन्हा पलंग '
दारे साधुसनी अलंग[18] '
वाजा कसाना[19] वाजस
लगिन तुयसीनं लागस
पंढरी लाल लाल
रुख्मा पाखडे गुलाल.

---

१ याच्या. ' ना ' हा षष्ठीचा प्रत्यय पुढें पुष्कळ ठिकाणीं येईल. २ आला. ३ झाल्या. ४ धारेमध्यें, प्रवाहांत. ५ फुलांचा. ६. धाव घेतात. ७ माझा. ८ वीणेवर. ९ चोळीसाठीं. १० जाते. ११ धामणगांवाला. १२ पैशाला. १३ माळा. १४ वीस. १५ बांधतो. १६ आणूं. १७ साधूंची. १८ ओळ १९ कशाचा.








## खानदेशांतील आहिराणी स्त्रीगीतें

मन्हा घर पावना    पंढरपुरना रघुनाथ
देवना आंगुयले[२०]    पानी ठेवूं बगोन्यांत
त्यासना[२१] भोजनले    साय[२२]-कमोदना भात
वर टाकाले    कपिला गायन दूधतूप
तोंड लावाले    हिरव्या लऊंगनी शाक[२३]
हातच पुसाले    रुमाल बारीक
चंद्रभागाले उन्हा पूर    चालती बारा नावा
साधुसंतना भरे खेवा    उतार नामदेवा
चंद्रभागाले उना पूर    पानी लागे पायरीले
देव इठ्ठल हाका मारे    रुखमाबाई सोयरीले.

### स्त्रीगीतांतून रामकथा

जसें पंढरीचें माहात्म्य तसेंच सीता आणि तिचा राम यांचेंसुद्धां. अशिक्षित स्त्रियांच्या मनांतून प्रकट झालेल्या या भावनांतून संपूर्ण रामायण त्यांच्या स्त्रीगीतांमधून ऐकूं येईल.

दहा वरीसना राम    पांच वरीसनी सीता
अशी पर्नी[२४] आनी    धन्य तूं रे दशरथा
राम नि लक्षुमन    चालतस बरोबर
सोनानी अब्दागिरी    छाया पडे तोंडवर
राम लक्षुमन    चालनात वनले
रेशमना गोंडा    येस्ना[२५] धनुषबानले
रामलक्षुमन    जोढना जोडमनी[२६]
गोरी सीताबाई    मझार सोभस[२७] हिरकनी
राम चाले नीट    लक्षुमन झाडे कांटे
शिरष्टीना[२८] पाठे    असा बंधु नाहीं कोठें
सीता करे कथा    राम आयकूं देयेना
सीता तुन्हं दुःख    मन्हा हिरदे[२९] मायेना[३०]
रामकुंडावर    उभ्या क्यात पांच गाई
राम करे दान    हात लाव सीताबाई
रामकुंडावर    हिरवा मंडप जाईना
आंघोयले उना    पुत्र कौसल्याबाईना
रामकुंडावर    सवासीस्नी झाई दाटी
गोरी सीताबाई    तबकमां कुंकू वाटी
राम चाले वाटे वाटे    सीता चाले काटे काटे
सीता रामले म्हने    येवढा वैताग तुन्हा साठे[३१]
राम लक्षुमन    लंकाना पारधी
लंकाना रावन    सीतावर घाले गर्दी
बारा वरीस उपास    काय कराले कारन
लक्षुमनना हाते    इंदरजितनं मरन.
मारा इंदरजित    शिर पडन रथमां
अमृतनी कुपी    सुलोचनाना हातमां[३२]
सीता सतवती    सतले जागनी[३३]
लंकाना रावनले    धर्म देवाले[३४] निंघनी[३५]
शिरष्टीना पाठवर    पतिवरता दोन्ही नारि
राम तुनी सीता    रावननी मंडोदरी
सीतानां सुद्धीले[३६]    नळ नीळ जांबुवंत
राम लक्षुमन    पुढें चाले हनुमंत
मना दारवर    राम राम करतां गया[३७]
देव रे मारुति    रामराया तुन्हां चेला
जयनी[३८] लंका    जयनं सोनंनानं
असं पराकर्मी    अंजनीनं बाळ तान्हं
मना माहेरना    मारोति बहु बांका
सोनानी बये[३९] लंका    रावन मारी हांका
मारोति रे राया    चाल चाल मन्हा वाडी
सेंदुरनी पुडी    तुले टाकूं पायघडी.
रामकुंडावर    कसानं धुम्रपान
देवमारुतीनी    मांडलं अनुष्ठान
भय वनमान[४०]    सीता लडस[४१] आयका
सीताले समजाविती    झाडझुडूप बायका.

नंतर लंकेंत रावणाचा पराभव होऊन, रावण यमसदनास जातो, सीताशुद्धि होते. राम, लक्ष्मण सीता परत अयोध्येला येतात आणि सीतेवर रावणाच्या घरीं राहिल्यामुळें वनांत पाठविण्याचा घोर प्रसंग गुदरतो. लक्ष्मण सीतेला वनांत नेत आहे त्या वेळीं सीता त्याला उद्देशून म्हणते :

देर लक्षुमन    तुन्हा मनमां कपट
माहेरनी वाट    माले[४२] दिसस[४३] अफाट
सीता नि सुंदर    घर बांधे डोंगरमां

---

२० आंघोळीस. २१ त्यांच्या. २२ साळकमोदाचा. २३ भाजी. २४ पर्णून आणली. २५ यांच्या. २६ जोडीचे जोडमणी ( दोन मोतींच जणूं ! ). २७ शोभते. २८ सृष्टीच्या. २९ हृदयांत. ३० मावेना. ३१ तुझ्यासाठीं. ३२ हातांत. ३३ जागली. ३४ द्यायला. ३५ निघाली. ३६ शुद्धीला. ३७ गेला. ३८ जळली. ३९ जळे. ४० वनांत. ४१ रडते. ४२ मला. ४३ दिसते.






अनुक्रमणिका





सुख नाहीं देख — रामरायाना मंदिरमां
सवारीला रथ — रथ चाले खयखय[४४]
सीता बठनी रथमां — राम रडे घयघय[४५]
बारा वरसे झायात — सीताबाईना तपले
लऊ नि आकुस — नाहीं वळखत बापले

आपल्या बापानें आपल्या आईला वनांत सोडून दिले आहे ही बातमी लवकुशांना कळते आणि—

लऊ नि आकुस — सीताबाईना कयवारी
धनुसना बान — सोडात रामरायावरी

तिकडून बाण नेमाचे येतात. म्हणून सीता म्हणते—

बान वरी बान — बान येतस नेमना
सीताबाई म्हने — वस[४६] बुडस[४७] रामना.

शेवटीं अशा या रामाचें पहांटे उठून नांव घ्यावें असें त्या सांगतील :

सकायले उठीसन — रामनं नांव लेवा
धरनीबाईवर — मंग पाऊल टाकवा

पुढील ओवीतील दृष्टान्त त्यांच्या नित्य जीवनांतील म्हणून त्याला मोल अधिक.

रामन नांव लेवाले — पापी कटाया[४८] करस
निथय[४९] सोडीसनी — पानी डधुय[५०] भरस[५१]

## पांच पांडव नि द्रौपदी

राममहिमा झाला आतां पांडवांचाहि कीर्तिमहिमा त्यांच्या ओव्यांत आढळून येईल.

पांची नि पांडव — देव ग्यात[५२] शिकारले
धुरपती सांपडनी — धाकटा अर्जुनले.

पुढचा सुभद्राहरणाचा प्रसंग :

अर्जुन संन्यासी — काय व्हवालें[५३] कारन
कृष्णाना देऊळमां — कये[५४] सुभद्राहरन
अर्जुन संन्यासी — कसा करता झाया
कृष्णना देऊळमान — पन सुभद्रानि कया

पुढें महाभारतांतील द्रौपदीवस्त्रहरणाचा तो करुणरम्य प्रसंग व भक्ताची लाज राखण्यासाठीं धांवून आलेल्या कृष्णाची कथा :

धुरपती नेसनी — काळ्या काठनी शेलारी
दुष्ट दुर्वेधन — डोळे पडनी अंधारी
धुर्पतीना वस्त्रें — ढीग कैलासले लागना
दुष्ट दुर्वेधन — हात वैरीना भागना
पिवया पीतांबर — गगनमां झयकना
शिरीकृष्ण बंधु — धुरपतीनी वळखला.

अशा या द्रौपदीच्या घरीं—

चंदनना पाट — टाकात हारोहार
कृष्णानी भाऊबीज — बहिन धुर्पतीना घर
भाऊनी भाऊबीज — बहिन धुर्पतीले पुस।
कृष्णोजी बंधु — इन्ही[५५] वळखला कसा

पारिजातकांच्या फुलांची नेहमींची कथासुद्धां या स्त्रीगीतांतून ऐकूं येईल.

पारिजातकनं झाड — सत्यभामा तुन्हा दार
फुलें गळतस[५६] — रुख्माबाईना शेजवर.

## ' भोया म्हादेव '

लग्नांत एकी-बेकी खेळतात त्या वेळची ही शिवपार्वतीच्या लग्नप्रसंगींची ओवी पहा : ( खानदेशांत लग्नवेळीं ही पद्धत रूढ आहे )—

महादेव पारबती — खेलनी एकी बेकी
पार्बती तोफांडीनी[५७] — लिना भोया म्हादेव जिकी.

शंकराला भोळा सांब म्हणतात त्याची ही अडाणी कारणपरंपरा पाहून हंसूं येतें आणि मजा देखील वाटते.

## ' सत्तरशिंगी अंबाबाई '

खानदेशला लागून असलेल्या नाशिक जिल्ह्यांत सप्तशृंगी हें एक परम दैवत आहे. चैत्रांत तेथें दरवर्षीं यात्रा भरते. त्या यात्रेला खानदेशांतून निरनिराळ्या जातींचे खूप लोक जातात. मुळांत सप्तशृंगी चढायला कठीण. त्या ठिकाणीं एक माता आपल्या मुलास म्हणते :

सत्तरशिंग्या गड — नवलाख पायरीना
तठे[५८] रहिवास — अंबाबाई सोयरीना
सत्तरशिंगी अंबाबाई — गडवरन[५९] रत्तन
असी ओप[६०] देस — अठरा भुजले काकन

४४ खळखळ. ४५ घळघळ. ४६ वंश. ४७ बुडतो. ४८ कंटाळा. ४९ नितळ. ५० गढूळ. ५१ भरतो. ५२ गेले. ५३ व्हायला. ५४ केलें. ५५ हिनें. ५६ गळतात. ५७ तोफांड करणारी. ५८ तेथें. ५९ गडावरील. ६० शोभा.










## खानदेशांतील अहिराणी स्त्रीगीतें

सत्तरशिंग्या गड     चढतां अवघड
तान्हियारे बाळ     आठुनि[61] पाय पड

### कौटुंबिक जीवन

जसे वरील देवतांचें कोड त्या आपल्या ओव्यां-तून गातील त्याचप्रमाणें आवताभोंवतालचें जग सुद्धां त्यांच्या या ओवीजगांत चित्रित झालेलें आपणांस दिसून येईल.

तुळसबाईला उद्देशून त्या म्हणतील :

तुयस व बाई     नको फिरूं रने बने
चाल मन्हा घर     जागा देस बिंद्रावने
तुयस व बाई     तूं तर जन्मनी कुवारी
चाल मन्हा घर     तुन्हा[62] लगननी तयारी.

आईचा महिमा मोजक्या शब्दांत पुढील ओव्यांत ऐकायला मिळेल :

माय माय करूं     माय कोनले व्हयेना
माउलीनी सर[63]     कोन नारीले[64] येयेना
माउली मावन[65]     केळी पानन जेवन
मायनावांचून     कोन्ही जानेना जीवन.

आपल्या भाऊरायाचा बडिवार मुक्तकंठानें गाणारी ही स्त्री पुढील ओव्या ऐकवील—

वाटना वाटसरु     काय देखस[66] खेडाले
सोनानं कुलूप     मन्हा भाऊना वाडाले
मन्हा भाउले     तमासानी मोठी गोडी
नाचनारीन साठे     हातनी मुंदी मोडी
वाटवरन्हा झिरा     कोन्ही उपसीन्हा
पाठना भाऊ मन्हा     चतुर पानी पिन्हा
सोनाना कंदील     रेसमनी वात
भाऊले झाई[67] रात     अमयनेरना कोटींत
झाई संध्याकाय     दारे दिवा वसरीले
भाऊनी पाटीलकी     भिल पारधी हजेरीले
पांनी भरत्या बाया     पाणथाले पानी किती
उतरती भाऊ भाचा     घोतरजोडा वल्ला व्हती[68]
माहेरले जाऊं     माहेरले कोन कोन
भावजई सीता     भाऊ राम लक्षुमन.
सुन्या भावजाई     दिवा लाव आडयाभिती
सावकार तुन्हा पति     मालन्या[69]व गाडया येती.

आखाजी म्हणजे अक्षय्य तृतीया व दिवाळी या दोन सणांसाठीं वाट पहाणारी बहीण म्हणते :

आखाजी खेयानी[70]     दिवायी ववायानी[71]
असी वाट देखूं     भाऊराया मुन्हायानी[72]
भाऊ भासाले[73] गाऊं गान     मावन भुशानले[74]
रामचंदरले गाऊं गान     दिहे गये कैलासले.

शेजी-बाई ( शेजारीणबाई ) प्रश्न विचारते तिला उत्तर देण्याची शैली किती सुंदर आहे पाहा—

शेजीबाई पुसे     तुले भवजाया किती
वडिलनी[75] सीता     धाकटानी पारबती.
दिवायीना खन     येले लखलख मोती
देख शेजीबाई     माहेरले गई[76] व्हती.
दिवायीच्या दिशीं     जसा धावे धावे दिवा
भाऊ कसा म्हने     आज बहिनना येवा.

माहेरच्या सुखाची ही ओढ सासरीं एका जीवाच्या आशेवर खुषींत जीवन जगत असते. कारण—

धनभर गोत     गवतना पुया[77]
भरतारना बयें[78]     डोंगर दिसे निया
भरतारनं सुख     तयहातनी[79] सावली
नाहीं आठवत     दूरदेशनी मावली

अशी ही सासुरवाशीण अहेव मरणाचीच अपेक्षा करते. वैधव्य पत्करून लाचारी पत्करण्यापेक्षां अहेव मरण पुरवलें आणि म्हणूनच त्याच्याहि ओव्या मुक्तकंठानें गातांना त्या आपणांस दिसून येतील :

अहेव मरन     सोमवारले उनं
भाऊ कसा म्हने     बहिननं झायं सोनं
अहेव मरन     तूं रे देशी जगन्नाथा
हळद-कुंकूना     उघड तुन्हा माथा

मेल्यानंतर अंगावरील साऱ्या गोष्टी—दागदागिने काढून घेतील. पण आईच्या हातानें गोंदलेलें मात्र बरोबर येईल आणि तेवढ्याचीच त्या अपेक्षा करतात—

---

६१ येथून. ६२ तुझ्या. ६३ बरोबरी. ६४ नारीला. ६५ प्रेमाची. ६६ पाहातो. ६७ झाली. ६८ ओले होतात. ६९ मालाच्या. ७० खेळायाची. ७१ ओवाळायाची. ७२ मुन्हाळ्याची. ७३ भाच्याला. ७४ भूषणास. ७५ मोठ्याची. ७६ गेली होती. ७७ पुळा. ७८ बळें. ७९ तळहाताची.












अहेव मरन  नका लावज्या चंदन
मायना हातनं  संगे येऊं द्या गोंदन
अहेव मरन  लोक म्हनती ‘चला चला’
राम कसा म्हने  ‘येऊं द्याना सख्खा साला’

येथें ‘राम’ ती स्वतःच्या पतीला उद्देशून म्हणते आणि तो तिच्या भावाची म्हणजे श्यालकाची वाट पाहात आहे.

अहेव मरन  लोक करथीन घाई घाई
राम कसा म्हने  ‘येऊं द्याना तिन्ही आई’
अहेव मरन  आई रडे सारी रात
साडीना पदर  वल्ला झाया सव्वा हात
अहेव मरन  सरन जये[८०] सावलीले
सर्वा गोतपेक्षां  दुःख झाये मावलीले

पोटाची पोर गेली, अहेवपणीं गेली, तरी आईचेंच आंतडें जास्त तुटणार.

सुतार, लोहार यांच्याविषयींचा आदर आपणांस त्यांच्या पुढील ओव्यांतून ऐकायला मिळेल :

सुतार लव्हार  मन्हा बापना गव्हाई[८१]
पलंगना साठे  दारे रुसना जवाई
सुतार रे भाऊ  धन्य तुन्ही माता
नवं बांध घर  वर काढी रामसीता

आणि शेजीविषयींचें आदर-प्रेम पुढील ओव्यांत दिसून येईल.

शेजीना शेजार  मन्ह आरध[८२] माहेर
उबगना जीव  जाई बसूं घडीभर
शेजीबाई शेजारले  मायबाई उसनाले
देवाजीनी माले  भाऊ दिन्हा भुशानले.
उनी शेजीबाई  तिले बसानं[८३] म्हनवा[८४]
तान्हिया बाळना  तिले अन्याव[८५] पुसवा
शेजारीन बाई  धन्य तुन्हा शेजारले
झायात बारा वरसे  नाहीं गई माहेरले.

शेजीचें प्रेम माहेराहून श्रेष्ठ वाटलें म्हणून माहेराला जाऊन एक तप उलटलें, पण जायचें नांव घेतलें नाहीं.

परंतु साऱ्याच सारख्या नसतात. एकादी खट निघाली म्हणजे--

शेजीना जाता घर  शेजी करे वन वन[८६]
कवय[८७] मन्हं मन  नेत्र भरनात पाण्यानं
शेजी घाले जिऊ  इचार करस मनले
माय घाले जिऊं  यू[८८] देयेना[८९] कोनले.

## ‘गांव अंमयनेर, पुन्नाइत जागा’

प्रत्येक स्त्री ज्या वातावरणांत वाढलेली असते, ज्या गांवांत जगत असते त्या गांवाचा महिमा सुद्धां ती आपल्या ओव्यांतून गुंफण्याचा प्रयत्न करते. अमळनेर गांव बोरीच्या कांठीं वसलें आहे. पंढरीच्या खालोखाल ह्या स्त्रिया अमळनेरला पवित्र मानतात. बोरी ही चंद्रभागा आणि पंढरीचे पांडुरंग सखारामबुवांच्या निमित्तानें या वाळवंटांत उतरले अशी त्यांची कल्पना. दर वैशाखांत येथें मोठी यात्रा भरते. त्या वेळीं रथ-पालखीच्या दिवशीं भक्तीला प्रचंड पूर येतो. गल्लीबोळांतून लोकांचा अफाट जनसमूह दाटतो आणि दर्शन घेऊन पुन्हां आपापल्या गांवाकडे हा प्रवाह परत जातो. अशा या अमळनेर गांवाचा महिमा ऐका :

गांव अंमयनेर  येन्ही आंबराई दाट
सखारामबुवानी  पालखीले करा वाट
गांव अंमयनेर  पुन्नाइत[९०] जागा
सम्माधीना पुढें  बोरी वाहे चंद्रभागा
सया[९१] संगातीनी  आपुन अंमयनेरले जाऊं
सखारामबुवाना  सम्माधीले फुलें वाहूं
सखारामबुवानी  अन्नानी कीर्ति कई[९२]
दाय-तांदुयनी  ठिकी[९३] मंडपले लाई[९४]
गांव अंमयनेर  अर्धी पंढरी बोलस
सखारामबुवानी  जशी सम्माध डोलस
पंढरीना देव  अम्मयनेरले उनात[९५]
सखारामबुवाना  सम्माधीले लाभनात
गांव अम्मयनेर  येन्हा गल्ले गल्ले[९६] वाळू
सखारामबुवाना  रथ येऊं द्या हळूं हळूं.

---

८० जळे. ८१ वर्षांचें धान्य घेऊन वर्षभर पडेल तें काम करणारे. ८२ अर्धें. ८३ बसण्याचें. ८४ म्हणावें. ८५ अन्याय. ८६ टाकून बोलणें. ८७ कोवळें. ८८ कळूं. ८९ देईना. ९० पुण्यवंत. ९१ मैत्रिणी. ९२ केली. ९३ थप्पी, चळस. ९४ लावली. ९५ आलेत. ९६ गल्लोगल्लीं.



अनुक्रमणिका






आगामी साहित्य-संमेलनाच्या निमित्तानें एक औचित्यपूर्ण आढावा : श्री. रा. का. कुलकर्णी

# • खानदेशांत होऊन गेलेले सुप्रसिद्ध मराठी साहित्यिक

मायबोलीच्या महोत्सवप्रसंगीं अमळनेर येथें भरणाऱ्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या आगामी ३५ व्या अधिवेशनाच्या निमित्तानें—मायबोलीच्या अमूर्त मूर्तीला 'देशीकार लेणें' चढवून तिला मानाचें स्थान प्राप्त करून देणाऱ्या व आपल्या वाग्यज्ञानें समकालीनांस व पुढिलांस प्रेरणा देणाऱ्या तिच्या अनेक थोर सुपुत्रांच्या स्मृतींनीं, संवेदनशील व कृतज्ञ महाराष्ट्रीय मन हेलावून हर्षनिर्भर होणें साहजिकच आहे. मर्यादेचीं बंधनें सांभाळून, मायबोलीच्या मानकऱ्यांच्या कार्याचा, प्रस्तुत प्रसंगीं साकल्यानें आढावा घेणें इष्ट असलें तरी तें कार्य अनावर व म्हणून अशक्यप्राय असें आहे. तथापि, गेल्या सुमारें ६० वर्षांतील खानदेशाच्या साहित्य-सेवेचें, विशेषतः खानदेशांत होऊन गेलेल्या कांहीं सुप्रसिद्ध साहित्यिकांच्या कामगिरीचें दिग्दर्शन करणें प्रसंगोचित होईल.

## खानदेशांतील वाग्यज्ञाची सुरुवात

'काव्यरत्नावली'च्या जन्माबरोबरच खानदेशांतील वाग्यज्ञाला सुरुवात झाली असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. इ. स. १८८७ या वर्षीं कवि के. स. रि. ( खानदेशांतील शेंदुर्णी या गांवचे रहिवासी व 'सुधारणावारणांकुश' व 'प्रभुलीलापद्यशती' या काव्यांचे कर्ते कै. केशव सदाशिव रिसबुड ) यांच्या प्रेरणेनें कै. नारायण नरसिंह फडणीस यांनीं जळगांव येथें मराठी काव्यवाङ्मयाला प्रेरणा देणारें 'काव्यरत्नावली' हें मासिक सुरू केलें. 'काव्यरत्नावली'कारांनीं मराठी साहित्याची केलेली सेवा संस्मरणीय आहे. इ. स. १८८७ ते १९३५ पर्यंतच्या काळांत त्यांनीं आपल्या 'काव्यरत्नावली'-च्या द्वारें मराठी काव्यवाङ्मयांत सुमारें दीड-दोन लक्ष कवितांची भर घातली. महाराष्ट्राचे आधुनिक कविकुलगुरु म्हणून ज्यांना संबोधिलें जातें व खानदेशांतील अर्वाचीन वाग्यज्ञाचे ज्यांना उद्गाते म्हणतां येईल त्या केशवसुतांचें 'केशवसुत' असें नामकरण 'काव्यरत्नावली'कारांकडूनच केलें गेलें! महाराष्ट्राचे एक आवडते कवि व असीम निसर्गभक्त बालकवि यांना 'बालकवि' अशी संज्ञा ज्या कवि-संमेलनांत लाभली तें १९०७ सालीं जळगांव येथें भरलेलें कविसंमेलन 'काव्यरत्नावली'कारांच्याच प्रेरणेनें व प्रोत्साहनानें साकार झालें.

## आधुनिक कविपंचकांतील तीन खानदेशी कवी

रे. टिळक, केशवसुत, विनायक, गोविंदाग्रज व बालकवि हे १८८५ ते १९२० या काल-विभागांतील श्रेष्ठ कवी म्हणून संबोधिले जातात. या कविपंचकापैकीं केशवसुत, विनायक व बालकवि यांचा जीवनकाल खानदेशांत व्यतीत झाल्यानें व विशेषतः या तिघींपैकीं विनायक व बालकवि हे मूळचे खानदेशचेच असल्यानें त्यांच्या वाङ्मया-वर खानदेशचे कांहीं संस्कार झाल्यास त्यांत नवल नाहीं. या कवित्रयानें आपल्या वाङ्मयद्वारें खानदेशाला महाराष्ट्र-साहित्यांत प्रतिष्ठा प्राप्त करून दिली आहे.

## आधुनिक कविकुलगुरु केशवसुत

आधुनिक कवींचे कवि व महाराष्ट्रांत विवेकयुग निर्माण करणाऱ्या आगरकरांपासून प्रेरणा घेऊन नवसमाजनिर्मितीसाठीं प्राणपणानें 'तुतारी' फुंकणारे कवि केशवसुत हे खानदेशांत व्यतीत केलेल्या आपल्या जीवनकालांत फैजपूर व भडगांव या गांवीं राहत असत. त्यांच्या 'दिवाळी' या कवितेंत :

'मी संध्यासमयीं खुशाल गिरणातीरावरी बैसुनी
कालक्षेप करीन उन्मन असा वेड्यापरी गाउनी'

असा भडगांवजवळून वाहणाऱ्या गिरणेचा त्यांनीं उल्लेख केला आहे. 'तुतारी' आदीकरून ज्या केशवसुतांच्या कांहीं उत्तमोत्तम कविता आहेत त्यांपैकीं 'नैर्ऋत्येकडला वारा', 'सतारीचे बोल', 'नवा शिपाई' व 'आम्ही कोण ?' या कवितांचीं रचनास्थळें खानदेशांतीलच आहेत. 'तुतारी' ही कविता आधुनिक समाजसुधारणेचें एक प्रभावी स्तोत्र आहे. 'स्फूर्ति' या कवितेंत दाहक पण








परिणामीं मंगलप्रद असें तेज वसत आहे. 'नैर्ऋत्येकडला वारा' ही कविता मानवसुलभ ममत्वानें व कारुण्यपूर्ण भावनेनें ओथंबलेली आहे. तर 'नवा शिपाई' या कवितेंत आधुनिक युगाची स्पष्ट ललकार ऐकूं येत असून तींत नव्या युगाचें सुस्पष्ट दर्शन होतें. उदाहरणार्थ, पुढील ओळी पाहा :

'नव्या मनूंतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहे
कोण मला वठणीला आणूं शकतो तें मी पाहे!
ब्राह्मण नाहीं, हिंदुहि नाहीं, न मी एक पंथाचा,
तेच पतित कीं जे आंखाडिती प्रदेश साकल्याचा!
जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत
सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत
कोठेंहि जा, पायांखालीं तृणावृता भू दिसते
कोठेंही जा—डोईवर तें दिसतें नीलांबर तें!

सांवलींत गोजिरीं मुलें,
उन्हांत दिसतीं गोड फुलें
बघतां मन हर्षून डुलें,

तीं माझीं मी त्यांचा, एकच ओघ अम्हांतुनी वाहे!
नव्या मनूंतील नव्या दमाचा शूर शिपाई आहे!'

नव्या युगाच्या या सुस्पष्ट दर्शनापेक्षां 'Federation of the World' चें सुखस्वप्न सूचित करणारा एखादा टेनीसन किंवा 'One World'ची कल्पना प्रसृत करणारा एखादा विंडेल विल्की तरी अधिक काय सांगूं शकणार? तात्पर्यार्थ हा कीं आमचे ज्ञानेश्वर, आमचे रवीन्द्रनाथ ठाकूर व आमचे केशवसुत यांच्या सहजोद्गारांतून अनेकत्वांत एकत्व पाहण्याचा त्यांचा व्यापक दृष्टिकोन दिसून येतो. इ. स. १८९८ सालीं लिहिल्या गेलेल्या 'नवा शिपाई' या कवितेंत प्रतीत होणारें कवीचें द्रष्टेपण पाहून 'दिक्कालांतुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके' या केशवसुतांच्या उक्तीची साक्ष पटते. काव्याच्या अंतर्बाह्य स्वरूपांत केशवसुतांनीं जो क्रान्तिकारक व दूरगामी फरक घडवून आणला त्यामुळें केशवसुतांचें, काव्यक्षेत्रांत जें युगप्रवर्तक कवि म्हणून स्थान आहे, तें आजहि अढळ असेंच आहे. हृत्सिंधूचें मंथन करून केशवसुतांनीं जें दाहक तेज निर्माण केलें, त्या तेजाची प्रखर झळाळी सहन न होऊनच कीं काय 'तुतारीमंडळ' स्थापन करणाऱ्या केशवसुतांच्या अव्वल सांप्रदायिकांनीं—गोविंदाग्रज, विनायक, बालकवि इत्यादींनीं—त्या तेजाकडे पाठ वळवून काव्यक्षेत्रांत आपापल्या मनोरचनेला पोषक अशा कार्यकक्षा आंखून घेतल्या! केशवसुतांनीं उभविलेलें निशाण खांद्यावर टाकून आज जर कोण वाटचाल करीत असतील तर ते मर्ढेकर आणि त्यांच्या संप्रदायांतील नवकवीच होत. नवकवींच्या काव्यकृतींतल्या कांहीं ठळक दोषांमुळें त्यांचें काव्य कांहींसें दुर्बोध व अनुदात्त वाटत असलें तरी त्यांच्या आत्मप्रकटीकरणांतील प्रामाणिकता व बंडखोरी लक्षांत घेतां त्यांच्या मनाचा घाट केशवसुती वळणाचाच आहे असें म्हणतां येईल.

### इतिहासकालांत रममाण होणारे विनायक

पारतंत्र्याच्या जाचक आंचीमुळें व ईप्सिताच्या अलाभामुळें व्याकुळ झालेले कवि विनायक यांचें मन एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील जीवनांत कधींच समरस होऊं शकलें नाहीं. स्वराष्ट्राच्या अभ्युदयाचीं बीजें मराठ्यांच्या स्फूर्तिप्रद रम्य इतिहासकालांत सांठविलेलीं आहेत, असें प्रतीत झाल्यानें महाराष्ट्राच्या या स्वातंत्र्यशाहिरानें मराठी काव्याला एक निराळें वळण लावून देऊन मराठ्यांच्या व रजपुतांच्या उज्ज्वल गतेतिहासांतील स्फूर्तिप्रद चित्रें रेखाटलीं. विनायकांच्या 'हतभागिनी' या कवितेंतील व्यंजक रचनेमुळें जीं दोन विरोधी चित्रें मनश्चक्षूंसमोरून तरळून जातात तीं चित्रें हृदयाचा ठाव घेणारीं आहेत. कवि म्हणून विनायकांचें पृथगात्म व्यक्तित्व प्रस्तुत कवितेंत संपूर्णतया प्रतिबिंबित झालें आहे. 'महाराष्ट्रलक्ष्मी', 'यापुढें', 'पन्ना', 'कृष्णाकुमारी', 'ध्यास तो भास' इत्यादि त्यांच्या कविता रसिकमनांत कायमच्या ठाण मांडून बसल्या आहेत.

'पूर्व दिव्य ज्यांचें, त्यांना रम्य भाविकाळ
बोध हाच इतिहासाचा सदा सर्वकाळ'

ही कवि विनायकांची उक्ति भांबावलेल्या राष्ट्रीय वृत्तीच्या हृदयाला सदैव उत्तेजित करीत राहील.

### निसर्गलीन बालकवि

स्वार्थानें बरबटलेल्या या मानवी जगांत इच्छित न मिळूं शकल्यानें, आपल्या मनोरचनेला न पेलवणाऱ्या जीवनकलहाला कंटाळून, याबज्जीव










बालस्वभावसदृश असलेल्या बालकवीनें--कोमल पांखरानें--मनोविनोदनार्थ वा दिव्यरसांत विलीन होण्याकरितां निसर्गाकडे भरारी मारावी यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. निसर्गकवि म्हणून बालकवींनीं मिळविलेलें मराठी काव्यक्षेत्रांतील स्थान अद्याप ध्रुवपदाइतकेंच अढळ असें आहे. बालकवींचें निसर्गपर काव्य म्हणजे आंग्लदेशीय निसर्गकवि वर्ड्स्वर्थ याच्या काव्याची विसाव्या शतकांतील हिंदी आवृत्ति नव्हे. वर्ड्स्वर्थ व बालकवि यांचे निसर्गाकडे पाहण्याचे दृष्टिकोनच मुळीं परस्परांशीं असदृश असे आहेत. बालकवि व वर्ड्स्वर्थ यांच्या भिन्न दृष्टिकोनांतील व्यवच्छेदक स्वरूपाचें विवेचन करीत असतां, प्रा. वाळिंबे आपल्या बालकवींवरच्या काव्यसमीक्षणात्मक प्रबंधांत लिहितात : " निसर्गाशीं तादात्म्य पावल्यामुळें बालकवींना निसर्गांतून बोध घेतां येणें शक्यच नव्हतें. निसर्गाच्या निकट सान्निध्यामुळें त्यांना सौंदर्य, प्रेम व आनंद या त्रयीचा साक्षात्कार झाला. यापरतें निसर्गानें त्यांना कोणतेंहि तत्त्वज्ञान शिकविलें नाहीं. इतरांना बोधामृत पाजावयास सांपडावें या हेतूनें त्यांनीं निसर्गाचा उपयोग करून घेतला नाहीं. निसर्ग व मानव यांच्यामधील विरोध त्यांनीं अनेक ठिकाणीं स्पष्ट केला असून निसर्गाची आनंदमयता व सौंदर्यपूर्णता यांवर भर दिला आहे हें खरें असलें, तरी वर्ड्स्वर्थनें केलें त्याप्रमाणें निसर्गातील वस्तूंच्या द्वारें त्यांनीं मानवाला कोणतेहि धडे दिले नाहींत. "

बालकवीच्या प्रतिभेंतून संक्रान्त झालेलें निसर्गाचें स्वरूप शरच्चंद्रिकेप्रमाणें हळुवार व विलोभनीय असें आहे. बालकवीच्या पद्यरचनेंत प्रसाद, शब्दांची कोंवळीक, नाद, रंग यांचें मनोहर मिश्रण आढळून येतें. स्थलाभावीं, केवळ त्यांच्या ' निर्झरास ' या एकाच कवितेंतील कांहीं ओळी उद्धृत केल्यास वरील विधानाची सत्यता पटेल :

' गिरिशिखरें वनमालाहि दरी दरी घुमवित येई
कड्यावरुनि घेऊनि उड्या खेळ लतावलयीं फुगड्या
घे लोळण खडकावरुनी फिर गरगर अंगाभंवतीं
जा हलुहलु वळसे घेत लपतछपत हिरवाळींत
पांचूंचीं हिरवीं रानें झुलव गडे झुलुझुलु गानें
हीं पुढचीं पिंवळीं शेतें सळसळतीं, गातीं गीतें
गर्द सांवल्या सुखदायी वेलींची फुगडी होई
इवलाली गवतावरतीं रानफुलें फुलतीं हंसतीं
झुलवित अपुले तुरेतुरे निळीं लव्हाळीं दाट भरे '

ऐहिकतावादाचा कितीहि हिरीरीनें व उच्च रवानें प्रचार केला गेला तरी मानवी जीवाचें अशाश्वत व बेगडी स्वरूप लक्षांत आल्यानंतर संसृति-कोलाहलानें श्रान्त झालेल्या मानवाला चिरशांति मिळवून देण्याकरितां बालकवींचा संदेश असा आहे : ' दिव्यरसीं विरणें जीव जीवित हें त्याचें नांव. '

## महाराष्ट्रशाहीर दु. आ. तिवारी

स्वतःची मातृभाषा मराठी नसतांना देखील मराठी भाषेंत विपुल काव्यरचना करणारे जळगांवचे कवि कै. दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी यांची कृति मराठमोळ्या मनास हरखून सोडणारी अशी आहे. मराठेशाही अस्तित्वांत असतांना उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं कान्यकुब्ज ब्राह्मण व पुरभय्ये घराणीं खानदेशांतील धरणगांव, एरंडोल, बहादरपूर इत्यादि गांवीं येऊन राहिलीं. आजहि हीं घराणीं अस्तित्वांत आहेत. उत्तर हिंदुस्थानांतील जीवनाचें वळण व हिंदी मातृभाषा यांची त्यांनीं जपणूक केली असली तरी व्यवहाराची भाषा मराठी असल्यानें उपरिनिर्दिष्ट लोकांनीं, विशेषतः कान्यकुब्ज ब्राह्मणांनीं मराठी भाषेवर चांगलेंच प्रभुत्व संपादन केलें आहे. ' मराठ्यांची संग्राम-गीतें ' व ' झांशीची संग्रामदेवता ' या तिवारींच्या लोकप्रिय काव्यांवरून मराठ्यांच्या उज्ज्वल इतिहासाबद्दलची त्यांची असीम श्रद्धा व प्रेम व्यक्त होते. शिवकालांत होऊन गेलेल्या उत्तर हिंदुस्थानांतील भूषण कवीनंतर शिवछत्रपति व त्यांचे वारसदार यांचें यशोगान करणारे तिवारी हे दुसरे कान्यकुब्ज कवि होत. कै. तिवारी हे अव्वल श्रेणींतील कवि नसले तरी कवि विनायकानें निर्माण केलेल्या शाहिरी पंथांतील एक चांगल्या दर्जाचे कवि आहेत.

## केशवसुत-संप्रदायांतील रहाळकर व सोनाळकर

केशवसुतांबद्दल नितान्त आदर असणाऱ्या विनायक व बालकवि यांच्याबरोबरच, खानदेशांतील भडगांव येथें बरींच वर्षें वास्तव्य करीत







असलेले नरहर शंकर रहाळकर व जळगांवचे कवि कै. के. म. उर्फ अप्पासाहेब सोनाळकर यांचाहि उल्लेख करणें आवश्यक आहे. रहाळकरांच्या काव्याचा उल्लेख करतांना प्रा. रा. श्री. जोग आपल्या ' अर्वाचीन मराठी काव्य ' या ग्रंथांत लिहितात : " वस्तुत: केशवसुतांचे पहिले चेले रहाळकर होत. केशवसुत खानदेशांत असतांना रहाळकर विद्यार्थिदशेंतच होते व अशा संस्कार-क्षम वयांत केशवसुतांच्या प्रत्यक्ष संगतीचा लाभ त्यांना झालेला होता. केशवसुतांच्यामुळें मिळालेल्या स्फूर्तीनें आणि त्यांच्याकडून लाभलेल्या प्रोत्साहनानें रहाळकरांनींहि काव्यरचनेस प्रारंभ केला. केशवसुतां-चें काव्य नवीन प्रकारचें आहे, चांगलें आहे ही गोष्ट या शिष्यानें इतरांपेक्षां आधीं जाणली असें दिसतें व त्याचें अनुकरण करून त्यानें तें इतरांपेक्षां आधींच दर्शविलें. "

' कमल-पराग ' कर्ते व तत्त्वज्ञ कवि म्हणून प्रसिद्ध असलेले कै. सोनाळकर यांनींहि काव्य, नाटक, निबंध व तत्त्वज्ञान इत्यादि वाङ्मयशाखांत लेखन करून मराठी साहित्यांत भर घातली आहे.

## खानदेशांतील स्फूर्तिकेन्द्रें

असामान्य व्यक्तींचा चिरसहवास वा अल्प-सहवास लाभल्यामुळें खानदेशांतील धुळें, अमळनेर व जळगांव हीं गांवें खानदेशाच्या जीवनाचीं विविध अंगें संपन्न करणारीं स्फूर्तिकेन्द्रें बनलीं आहेत. इतिहासाचार्य कै. राजवाडे यांच्या उत्तर आयुष्याचा काळ धुळ्यास व्यतीत झाल्यानें त्यांच्या प्रभावी व्यक्तित्वामुळें स्फूर्ति लाभून समर्थभक्त शंकर श्रीकृष्ण ऊर्फ नानासाहेब देव, श्री. भा. वा. भट, कै. गो. का. चांदोरकर इत्यादींनीं ' समर्थवाग्देवतामंदिर ', ' सत्कार्योत्तेजक सभा ', ' समर्थसेवाश्रम ' व ' राजवाडे-संशोधनमंदिर ' या संस्थांच्या द्वारें अमूप साहित्यसेवा करून ' खानदेशचें पुणें ' अशी संज्ञा धुळें शहराला प्राप्त करून दिली आहे. अमळनेर येथें भरणाऱ्या आगामी महाराष्ट्र-साहित्यसंमेलनाच्या अधिवेशनाचे नियोजित अध्यक्ष प्राचार्य कृ. पां. कुलकर्णी हे धुळें येथील थोर परंपरा असलेल्या गरुड हायस्कूल-मध्यें अध्यापनाचें कार्य करीत असतांनाच्या काळांत, इतिहासाचार्य राजवाडे यांचें वास्तव्य धुळें शहरीं होतें. प्रा. कुलकर्णी यांना कै. राजवाडे यांच्या मार्गदर्शनाचा सुदैवानें लाभ झाल्यामुळें मराठी भाषा, व्याकरण व व्युत्पत्ति या उपेक्षित पण अत्यंत महत्त्वाच्या क्षेत्रांत त्यांना मौलिक कामगिरी करतां आली.

श्रीसखाराममहाराजांमुळें ' दुसरें पंढरपूर ' म्हणून महाराष्ट्रांत प्रसिद्ध असलेल्या अमळनेरचें वैभवसंपन्न आधुनिक अमळनेरांत रूपान्तर करणारे थोर शिल्पकार श्रीमंत प्रतापशेटजी हे आहेत. त्यांच्या उदार दातृत्वामुळें ध्येयवादी कार्यकर्त्यांस कार्य करण्यास क्षेत्र मिळून 'खानदेश-शिक्षणमंडळ', 'तत्त्वज्ञानमंदिर' या संस्था अमळनेर येथें निर्माण झाल्या. महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राबाहेरील ध्येयशील माणसें उपरिनिर्दिष्ट संस्थांमुळें अमळनेरकडे आकृष्ट होऊन त्यांनीं अमळनेरला एक अपूर्व स्थान प्राप्त करून दिलें आहे. अमळनेर हें एक स्फूर्तिकेन्द्र बनलें आहे. अमळनेरकडे आकृष्ट झालेल्या ध्येयशील व्यक्तींपैकीं साने गुरुजी व माधवराव पटवर्धन यांचा थोर साहित्यिक म्हणून उल्लेख करणें आवश्यक आहे.

## साने गुरुजी

'खानदेश शिक्षणमंडळा'च्या 'प्रताप हायस्कूल'-मध्यें अध्यापनाचें कार्य करणाऱ्या ' साने सरां 'चें व्यक्तिमत्त्व विशाल होत होत खानदेशभर कसें पसरत गेलें याचें भावपूर्ण व कलात्मक चित्रण सानेगुरुजींचे प्रताप हायस्कूलमधील एक पूर्व-विद्यार्थी, ' मृगाजिन ' कर्ते श्री. व. ग. कुलकर्णी यांनीं केलें आहे. साने गुरुजींच्या कार्यगंगेचा प्रभावी प्रवाह खानदेशाच्या मर्यादा ओलांडून महाराष्ट्रभर दुथडी वाहत गेला व त्यानें महाराष्ट्राचें पाप-ताप शमन करून त्याला मातेच्या प्रेमानें रिझविलें, वाढविलें. मानवी जीवन संपन्न व विकसित होण्या-करितांच गुरुजींनीं वाङ्मयनिर्मिति केली. कथा, कादंबऱ्या, निबंध, प्रबंध, नाटकें, काव्य इत्यादि साहित्यशास्त्रांत त्यांची लेखणी अप्रतिहतपणें चालली. त्यांनीं निर्माण केलेलें बालवाङ्मय व विशेषतः ' श्यामची आई ' या वाङ्मयीन कृतीमुळें महाराष्ट्र-वाङ्मयांत त्यांना वैशिष्ट्यपूर्ण स्थान लाभलें आहे.












आचार्य विनोबाजी भावे, आचार्य कालेलकर या थोर साहित्यिकांनीं निर्माण केलेल्या साहित्यांतील शुचिर्पंथांत गुरुजींचा समावेश होतो. कुणींहि वाचावें व पावन व्हावें, अशा मोलाचें गुरुजींचें वाङ्मय आहे. खानदेशाची जनता व गुरुजी यांचें परस्परांवर असीम प्रेम होतें. आगामी महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या अधिवेशनस्थानाचें ' सानेगुरुजी-साहित्यमंदिर ' असें जें नामकरण नियोजित केलें गेलें आहे त्यावरून वरील विधानाची सत्यता पटेल.

## माधवराव पटवर्धन

प्रक्षुब्ध परिस्थितीच्या लाटांवर हेलकावे खात खात अस्वस्थ झालेले माधवराव पटवर्धन मनोदाह शान्त करण्याकरितां अमळनेरसारख्या दूरस्थ आडवळणाच्या गांवीं आले. कार्यमग्न राहून दुःखद स्मृतींचा विसर पडावा म्हणून त्यांनीं कांहीं काळ प्रताप हायस्कूलमध्यें अध्यापनाचें कार्य केलें. खानदेशांत त्यांना लाभलेल्या प्रेमळ व उदार स्नेह्यांच्या सहवासांत त्यांची मनोव्यथा कमी होऊन त्यांचें मन विसावलें व त्यांचें साहित्यिक हृदय पुन्हां बहरलें. त्यांच्या या बहरलेल्या हृदयांतूनच ' संगमोत्सुक डोह', ' विरहतरंग ' व ' सुधारक ' हीं काव्यें उत्स्फूर्त होऊन साकार झालीं. माधवराव पटवर्धनांचें शब्दसृष्टीवर असामान्य प्रभुत्व होतें. जुन्या कार्यक्षम शब्दांची जोपासना व नव्या शब्दांची निर्मिति करणारे त्यांच्यासारखे शब्दप्रभु महाराष्ट्रांत फार थोडे होऊन गेले किंवा असतील. खानदेशांतील बहुजनसमाजाच्या बोलींत अभिव्यक्तीच्या दृष्टीनें जे योग्य असे शब्द त्यांना आठवले त्यांचा हेतुपुरस्सर वापर टीकाकारांची पर्वा न करतां अमळनेर येथील वास्तव्यांत लिहिल्या गेलेल्या उपरिनिर्दिष्ट काव्यांतून त्यांनीं केला. उदाहरणार्थ, ' विरहतरंग', श्लोक २०१ मधील पुढील ओळ पाहा : 'केल्या मीं किती रावण्या विनवण्या ! गेलें न येऊं शके', ह्या पंक्तींतील 'रावण्या' हा 'आर्जव, विनंति ' ह्या अर्थाचा शब्द खानदेशी भाषेंत रूढ आहे. त्याचप्रमाणें 'वडांग' हा कुंपण या अर्थीं रूढ असलेला खानदेशी हेंगाडा शब्दसुद्धां त्यांनीं आपल्या काव्यांत बिनदिक्कतपणें योजला आहे. खानदेशबद्दल त्यांना कृतज्ञतेच्या व सौहार्दाच्या भावनेनें नेहमींच आपुलकी वाटत असे. अमळनेर येथें वास्तव्य केल्यानंतर अल्पावधींत मनःशांति लाभण्यासाठीं अमळनेर येथील बोरीकांठीं उभ्या असलेल्या पांडुरंगाला आळविण्यासाठीं त्यांनीं 'हाकाटी' या शीर्षकाखालीं जें अभंगपंचक लिहिलें त्यांत त्यांचें हृदय स्वच्छपणें प्रतिबिंबित झालें आहे. उदाहरणार्थ, त्यांतील पुढील ओळी पाहा :

'तुकोबाच्या पांडुरंगा भावनेच्या अंतरंगा !<br>
बोरी हीच चंद्रभागा हीच पंढरीची जागा<br>
तुम्ही त्रैलोक्याचे राजे तुम्ही मायबाप माझे<br>
झाला उशिरां आठव तरी येऊं द्याहो द्रव.<br>
उचलून घ्याहो मला घट्ट उराशीं आवळा.<br>
तेंच माझें परंधाम सुखी जेथें आत्माराम.<br>
मग थांबेल हांकाटी कशासाठीं ? कोणासाठीं ? '

कै. माधवराव पटवर्धन यांचें खानदेशांतील वास्तव्य दीर्घकालीन नसलें तरी त्यांच्यासारख्या थोर साहित्यिकाबद्दल खानदेशला अपार आपुलकी वाटत होती व त्याचें दृश्यफल म्हणजे १९३६ सालीं जळगांव येथें भरलेल्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदीं खानदेशनें माधवराव पटवर्धनांची योजना केली.

येथवर खानदेशांत होऊन गेलेल्या थोर साहित्यिकांच्या कार्याचा अल्पसा परामर्श घेतला गेला आहे. या थोर साहित्यिकांखेरीज गेल्या पिढींतील व चालू पिढींतील अनेक खानदेशी साहित्यिकांचा उल्लेख करणें प्रसंगोचित असलें तरी आतां तें स्थलाभावीं अशक्य आहे. खानदेशांतील साहित्य आजवर सुशिक्षित मध्यमवर्गीयांकडूनच लिहिलें गेलें असल्यानें, खानदेशांतील बहुजनसमाजाच्या जीवनाचें प्रतिबिंब त्यांत फारसें पाहावयास मिळत नाहीं ही गोष्ट सत्य आहे. यापुढें शिक्षणाच्या संस्कारानें विकसित होत असलेली खानदेशांतील बहुजनसमाजाची चालू पिढी वाङ्मयाच्या प्रांगणांत उतरून खरेंखुरें खानदेशी साहित्य निर्माण करील अशी अपेक्षा करूं या.







एक व्युत्पत्तिविचार : प्रा. म. अ. मेहेंदळे

# 'विठ्ठल–रखुमाई'

महाराष्ट्रांतील वारकरी संप्रदायाची विठ्ठल देवता सुप्रसिद्धच आहे. 'विठ्ठल' ह्या शब्दाच्या व्युत्पत्तीविषयीं समाधानकारक खुलासा मात्र अद्याप वाचण्यांत आला नाहीं. 'महाराष्ट्र–शब्दकोशां'त वित् (= ज्ञान) + ठ (= शून्य) + ल (= परिपालक) म्हणजे अज्ञान्यांचा कैवारी ही दिलेली व्युत्पत्ति पांडित्यदर्शक वाटते. 'विचा केला ठोबा' ह्या तुकोबारायांच्या उक्तींतूनहि कांहीं समाधान करील असा अर्थ निघत नाहीं. पुंडलीकाचे भेटी परब्रह्म आलें असतां त्यानें त्यांस उभे राहण्यासाठीं पुढें केलेल्या विटेशीं ह्या 'विठ्ठला'चा जोडलेला संबंध आख्यायिकेपुरताच शोभून दिसतो. तेव्हां शब्दकोशांतच 'विष्णु' पासून 'विठ्ठल' ही जी दुसरी प्रश्नचिह्नांकित व्युत्पत्ति सुचावेली आहे ती चिन्त्य उरते.

## 'विष्णु' पासून 'विठु'–'विठ्ठल'

'विष्णु' पासून 'विठु' अगर 'विठ्ठल' हें अवघड दिसतें खरें. कारण 'ष्ण' ह्या संयुक्त वर्णाची 'ण्ह', 'न्ह' अशीं रूपान्तरें झालेलीं दृष्टीस पडतात. म्हणूनच प्रा. कृ. पां. कुलकर्णी मराठी 'व्युत्पत्तिकोशा'च्या ६५८ पानावर "विष्णु पासून 'विठु' निघणें स्वरप्रक्रियेच्या दृष्टीनें अशक्य वाटतें." असें म्हणतात. तथापि 'ष्ण' चा उच्चार 'ष्ट' सारखा बंगालकडे कांहीं शब्दांत होतो. ह्या उच्चारणविशेषाविषयीं अधिक माहिती डॉ. सुनीतिकुमार चतर्जी यांच्या 'बंगाली भाषेचा उद्गम व विकास' ह्या इंग्रजी पुस्तकांत पान ५२६-५२७ वर सांपडते. त्यावरून असें दिसतें कीं अतिप्राचीन बंगालींतच 'ण' चा 'ण्ट' असा उच्चार करण्याची लकब होती. कारण तिप्पेरा येथील इ. स. च्या सातव्या शतकांतील एका लेखांत 'द्रोण' चें 'द्रोण्ट' असें रूप आढळतें. त्यावरूनच अर्वाचीन बंगालींत 'ण' ऐवजीं 'ट' हा उच्चारविशेष व त्याबरोबरच 'ष्ण' चा 'ष्ट' असा उच्चार करण्याची पद्धत आली आहे. हे उच्चारविशेष दाखविणारीं खालील उदाहरणें डॉ. चतर्जी यांनीं आपल्या पुस्तकांत दिलीं आहेत : "किपटा (कृपण), चिकटा (चिक्कण), फटा (फण), किश्टा (कृष्ण–काळा रंग), तेष्टा (तृष्णा), बिष्टुं-बिष्टु (विष्णु), उष्टों (उष्ण)" इत्यादि. तेव्हां 'ष्ण' चा 'ष्ट, श्ट' असा उच्चार करण्याची पद्धत बंगालकडे फार जुनी दिसते. ह्यावरून असें अनुमान निघतें कीं, मराठींतील 'विठु' हा उच्चार बंगालकडील 'बिश्टु' (विष्णु > बिश्टु > विठु > वीठ्ठु) ह्या उच्चारावरून आला असावा. पूर्वेकडे मागधी प्राकृतापासूनच 'श्' वर्णाशीं युक्त असलेलीं संयुक्त व्यंजनें उच्चारण्याची पद्धत असल्यामुळें, बंगालकडे जुना 'श्ट' हा उच्चार राहिला, पण मराठींत मात्र इतर भाषांप्रमाणेंच त्याचें श्ट > ठ असें रूपान्तर झालें. 'विठू' ह्या उच्चाराची ही परंपरा पाहिली म्हणजे त्या शब्दाची व्युत्पत्ति विष्णूपासूनच आहे ह्याविषयीं शंका उरत नाहीं.

'विठु'विषयीं आणखी एक दुसरा विचारहि नमूद करावासा वाटतो. वायव्य–सरहद्द–प्रांतांतील ललितपूर गावांजवळील एका शिलालेखांत 'वी [ठु]' असें नांव आलें आहे. हा शिलालेख इ. स. च्या दहाव्या शतकाइतका प्राचीन आहे. वायव्य-सरहद्द-प्रांतांतील हा लेख असल्यामुळें त्यांत येणारा हा शब्द खरोखर महत्त्वाचा आहे. याच भागाच्या आसपास प्रसिद्धीस आलेल्या पैशाची प्राकृतांत नियमानें व तत्पूर्वींच्या अशोकाच्या व त्यानंतरच्या खरोष्ठी शिलालेखांत क्वचित् दिसणाऱ्या उच्चारविशेषांत व पौर्वात्य प्राकृतांतील उच्चारांत कांहीं विशेष साम्यें आढळलीं आहेत. त्यावरून एक अनुमान असें निघूं शकतें कीं, आर्यांच्या कांहीं भाषांत ते पूर्वेकडे येण्यापूर्वीं कश्मीरच्या आसपास असतांना कांहीं उच्चारांच्या लकबी निर्माण झाल्या व त्यांतीलच कांहीं आर्यांच्या पूर्वेकडील वसाहतींबरोबर तिकडे जाऊन बद्धमूल झाल्या.

' ष्ण ' चा ' ट्ट ' हा पूर्वेकडील उच्चारप्रकार व वायव्य सरहद्द-प्रांतांतील लेखांत आढळणारा ' वीठु ' हा शब्द-ह्यांवरून हा ' इट ' उच्चार-विशेषसुद्धां भारताच्या अति-उत्तरेकडील भागांत प्रथम रूढ झाला असावा असा तर्क निघतो आणि मग विष्णूचें ' वीठु ' हें नांव वरूनच खालीं आलें असण्याची शक्यता आहे. [ पैशाची प्राकृतांत मृदु व्यंजनें कठोर होतात. वायव्य-सरहद्द-प्रांतांतील शाहबाझगढी येथील अशोकाच्या लेखांत ' जाणें ' ह्या अर्थी व्रच् ( सं. व्रज् ) हा धातु आला आहे. आणि जुन्या मराठींतहि तो ' वचणें ' ह्या स्वरूपांत आढळतो--( ' या लागीं न वचें कौंडिण्यपुरा । ' ) ]

ही व्युत्पत्ति ग्राह्य धरण्यास विठ्ठलभक्ति ही पूर्वेकडून वा उत्तरेकडून आपल्याकडे आली असें म्हणणें रास्त दिसतें. विष्णु ही वैदिक कालापासून आर्यांची देवता असल्यामुळें, वैष्णवसंप्रदायाच्या प्रसाराबरोबरच तिचा प्रसार उत्तर-पूर्वेकडून खालीं आला असावा असें मानणें जास्त सयुक्तिक वाटतें. विठ्ठलमूर्तीचा सांवळा वर्ण हा अर्थातच विष्णु-कृष्णांतील अद्वैताचा परिणाम आहे. परंतु मूर्तीचा रंग आपल्याकडे पालटला तरी तिचा मुळांतला धवल वर्ण हा ' पांडुरंग ' ह्या विशेषणांत कायम राहिला. विठ्ठलाचें मूळचें रूप विष्णु होतें हें लक्षांत घेतलें म्हणजे सांवळा विठ्ठल ' पांडुरंग ' कसा, ह्याचें आश्चर्य वाटेनासें होतें.

### ' लक्ष्मी ' पासून ' रखमाई '

' रखुमाई ' ह्या नामाविषयीं विचार करतांना तिचें मूळ 'रुक्मिणी' शब्दांत आहे एवढेंच सांगितलें जातें. कृष्ण-रुक्मिणी-संबंध प्रसिद्ध असल्यानें व कृष्ण व विठ्ठल एकच मानल्यानें हा एवढा खुलासा पुरेसा वाटतो. पण विठ्ठलाचें मूळ 'विष्णु' ह्या देवतेंत सांपडल्यावर पुढें लगेच रुक्मिणीविषयींहि असा विचार मनांत येतो कीं, रुक्मिणी हें देखील 'लक्ष्मी' ह्या शब्दाचेंच दुसरें रूप असावें. पुराणांत विष्णु-लक्ष्मी-संबंध प्रसिद्ध आहे. पूर्वेकडे अगदीं अशोक-कालापासून 'ल'-वर्णयुक्त उच्चार सांपडतात आणि त्यास जे पश्चिमेकडे वगैरे प्रतिशब्द आहेत त्यांत ' र ' हा उच्चार आहे. तेव्हां पूर्वेच्या ' लक्ष्मी '-चाच पश्चिमेकडील ' रुक्मिणी ' हा अवतार असावा आणि विशेषतः कृष्ण-विष्णूंतील ऐक्य प्रस्थापित झाल्यानंतर विष्णूला जशी लक्ष्मी तशी कृष्णाला रुक्मिणीची जोड मिळाली असावी. महाराष्ट्रानें विठ्ठल शब्दांत जरी पूर्वेचा उच्चार कायम ठेवला तरी त्याबरोबर 'लखमी' असा पौर्वात्य शब्द न घेतां तेथें मात्र ' रखुमाई ' असा शब्दच कायम केला आहे.

वरील उपपत्ति ग्राह्य ठरल्यास 'विठ्ठल' ही देवता मूळ द्राविडी मानण्याचें अगर ' विठु ' हें नांव मूळ आस्ट्रोएशियाटिक समजण्याचेंहि कारण उरत नाहीं. विठ्ठल-रखुमाई हीं विष्णु-लक्ष्मीचाच अवतार दिसतात.

---

## तत्त्वज्ञानाचें व जीवनाचें सार

सगळ्या तत्त्वज्ञानाचें, सगळ्या जीवनाचें मूलभूत सार सांगायचें झालें तर तें फार साधें आणि जुनें आहे. तें इतकें साधें आहे कीं, मला तें सांगायचाहि संकोच वाटतो ! कारण, तें ऐकून कांहीं चिकित्सक अश्रद्ध शहाणे उपहासानें हंसूंच लागतील ! पण त्यांची क्षमा मागून मी तें सांगतोंच : माझ्या दृष्टीनें सर्व तत्त्वज्ञानाचें आणि जीवनाचें मूलभूत सार जर कोणतें असेल तर तें प्रेम-खिस्ताला अभिप्रेत असलेलें प्रेम--किंवा करुणाभाव हें होय. एकदां या प्रेमभावनेचा किंवा करुणाभावनेचा हृदयाला स्पर्श झाला तर जगांत जगायचें कशासाठीं, वागायचें कसें, धैर्य, शौर्य अंगीं कशासाठीं बाणवायचें, आपली बुद्धि प्रामाणिक ठेवण्याची गरज काय-या सर्व प्रश्नांचा उलगडा होतो. धर्मानें माणसाला जें कांहीं मिळण्याची गरज असते, तें सर्व या प्रेमभावनेनें मिळतें.

—बर्ट्रंड रसेल-( ' Impact of Science on Society ' या पुस्तकांतून )








श्री. ह. कृ. मोहनी

# कै. किशोरलाल मशरूवाला यांची जीवनसाधना

महात्मा गांधी आफ्रिकेंतून हिंदुस्थानांत आल्यानंतर ज्या असाधारण कार्यकर्त्यांची जोड त्यांना प्रारंभीं मिळाली त्यांत श्री. किशोरलाल मशरूवाला यांची गणना होते. श्री. काकासाहेब कालेलकर, महादेवभाई देसाई, स्वामी आनंद, विनोबा भावे, नरहरिभाई हे गांधीजींच्या भोंवतालच्या कार्यकर्त्यांच्या नभोमंडळांतील तेजस्वी तारे केव्हांहि समजले जातील. किशोरलाल मशरूवाला ह्यांनीं आपल्या अहर्निश साधनेमुळें असें कांहीं अलौकिक वैशिष्ट्य प्राप्त करून घेतलें कीं, त्यांच्या व्यक्तिमत्त्वामुळें ते या असाधारण कार्यकर्त्यांमध्येंहि उमटून दिसले. १९३३ नंतर महात्मा गांधी साबरमती सोडून वर्ध्यास आले. वर्ध्यास गांधीजींच्या निकटच्या सहकाऱ्यांत जमनालालजी बजाज, जे सी. कुमाराप्पा, श्रीकृष्णदासजी जाजू, रघुनाथराव धोत्रे, आचार्य धर्माधिकारी, प्यारेलालजी, सुशीला नायर, आशादेवी, आर्यनायकम्प्रभृति धुरंधर कार्यकर्ते एकत्रित झालेले होते. ह्या अनेक कार्यकर्त्यांकडे एकसमयावच्छेदानें पाहिल्यास श्री. किशोरलालजी ह्यांच्या चारित्र्यांत त्यांच्या ध्येयविषयक तीव्रतेमुळें कांहीं निराळीच असामान्यता होती असें दिसून येतें.

रात्रीदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग
अंतर्बाह्य जग आणि मन।
जीवाही आगोज पडती आघात
येऊनिया नित्य नित्य करी।
तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें
अवघियांचें काळें केलें तोंड।

ह्या अभंगांतील प्रत्येक शब्द किशोरलालजींच्या बाबतींत अगदीं अन्वर्थक आहे. त्यांचें शरीर कित्येक वर्षांपासून दुर्बल बनलें होतें. आनुवंशिकता हेंहि कदाचित् एक कारण ह्या दुर्बलतेस असूं शकेल, अशी शंका आहे. पुढें पुढें दम्याच्या विकारानें ते सारखे आजारीच असत. तथापि, त्यांची इच्छाशक्ति व त्यांचें जर्जर शरीर यांचें तुंबळ युद्ध हरघडीं चाललेलें आहे, असें त्यांच्याकडे पाहिल्यास कोणासहि आढळून येई. तथापि, ह्या शरीराच्या कमकुवतपणामुळें आपल्या कार्यव्यापृतत्वामध्यें व मनःशुद्धीमध्यें क्षणाचाहि खंड त्यांनीं पडूं दिला नाहीं, असें अतिशयोक्ति न करतां म्हणतां येण्यासारखें आहे. 'करूं किंवा मरूं (Do or Die)' हा जो मंत्र १९४२ सालीं गांधीजींनीं देशास दिला त्याचें जागतें व जिवंत उदाहरण किशोरलालजी हे जन्मभर होते, असें त्यांचें यथार्थ वर्णन करतां येईल. मृत्यूच्या डोक्यावर पाय ठेवून किशोरलालजी अलीकडे कांहीं वर्षें तरी सदैव नाचत राहिले, असें त्यांच्या शरीरबळीचें रोमहर्षक चित्र उभें राहतें.

## तपस्वी साधक

गीतेंतील, 'शमो दमस्तपः शौचम् क्षांतिरार्जवमेव च। ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम्।' हे ब्राह्मणोचित गुण किंवा दैवी संपत्तीच्या वर्णनांत निर्देशिलेले 'अभयं सत्त्वसंशुद्धिः' इत्यादि गुण यांचें स्पष्ट प्रतिबिंब आपल्या आचरणांत पडावें अशासाठीं निरलसतेनें मनःपूर्वक तपश्चर्या करणें हाच हव्यास श्री. किशोरलालजींनीं आपल्यामागें जन्मभर लावून घेतला होता. ह्या गुणांसाठीं शारीरिक, मानसिक व वाङ्मय यज्ञ करावा हाच किशोरलालजींचा स्वभाव बनलेला होता. आणि ह्याच अर्थानें ते हुतात्मा झाले होते. 'यो मे भक्तः स मे प्रियः' असें भगवानानें म्हणावें ह्यासाठीं ज्या गुणांची आवश्यकता सांगितलेली आहे त्याचें अधिष्ठान आपण बनावें, ह्याकरितां किशोरलालजींनीं जन्मभर साधना केली, असा त्यांच्या समाधीवरील कोरीव लेख होऊं शकेल.

महात्मा गांधींनीं अनेक गुणांचा आदर्श आपल्या मनापुढें ठेवून त्याच्या अनुरोधानें आपलें मन दररोज किंवा दरक्षणीं शुद्ध करीत जाणें हीच साधना जन्मभर बनविली. त्यांच्या चित्रगुप्ताच्या डायरीमध्यें अशी नोंद त्यांनीं चालू ठेविली. ही दारुण किंवा भयंकर साधना करणाऱ्या व्यक्ती









# कै. किशोरलाल मशरूवाला यांची जीवनसाधना

जगतीतलावर अत्यंत विरळा आहेत. सात्त्विक गुणांचें पैलतीर साधकास ह्या जगांत सांपडणें शक्य नाहीं. क्षितिजाप्रमाणें किंवा अंतराळाप्रमाणें त्या गुणांची परिसीमा दूरदूरच जात असते. ह्या क्षितिजास साधकाचा हात पोंचूं शकत नाहीं. हे गुण सूक्ष्माहून सूक्ष्म होत राहतात. म्हणून या बाबतींत साध्य आणि साधन एकच झालीं आहेत असा प्रत्यय साधकास येत राहतो. ह्या साधनेमध्यें महात्मा गांधींना जे हाताच्या बोटावर मोजण्याइतके अनुयायी भेटले त्यांत किशोरलालजी हे एक होते. शर्यतीच्या घोड्यास ज्याप्रमाणें जॉकी देहपतनाची पर्वा न करतां शर्यत जिंकण्यासाठीं धांववीत सुटतात, त्याप्रमाणें मनाच्या अश्वावर स्वार होऊन अशी साधना करणारे हे वीरपुरुष दिव्यतेच्या लक्ष्याकडे स्वतःस भरधांव सोडतांना दिसून येतात. पंचाग्निसाधनापेक्षां किती तरी खडतर असें हें तप आहे ! अशा तपस्वी साधकांस महात्माजींनीं साबरमतीस स्थापन केलेल्या सत्याग्रहाश्रमाच्या कडक शिस्तीचा केव्हांहि बोजा न वाटल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. हा महात्माजींचा आश्रम म्हणजे सत्याग्रह किंवा सविनय कायदेभंग करण्याची पूर्व तयारी होती. सत्याग्रहाश्रमांतील जीवन म्हणजे स्वखुषीचें तुरुंगांतील जीवन होतें. महात्माजींजवळ राहणाऱ्या आश्रमांतील मध्यमवर्गीयांना दरिद्रनारायणाच्या पूजेसाठीं हें क्रांतिकारक जीवन महात्माजींनीं आंखून दिलें होतें. किशोरलालजी यांचें शरीर दुर्बल असतांहि, त्यांचें मन या कारावासतुल्य जीवनास कधींहि किंचिन्मात्र कचरलें नाहीं. ह्याचें कारण त्यांची ही दुश्चर तपश्चर्याच होती, यांत कांहीं शंका नाहीं.

> ' अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य असंग्रह
> शरीरश्रम अस्वाद सर्वत्र भयवर्जन
> सर्वधर्मीं समानत्व स्वदेशी स्पर्शभावना '

हीं एकादश व्रतें ज्यांनीं कसोशीनें आत्मसात् करून दाखविलीं असे किशोरलालजींसारखे धर्मवीर विरळाच होत.

## स्वातंत्र्यप्राप्ति ही धार्मिक साधना

राजकारणक्षेत्रांत महात्माजींना किती तरी थोर, असामान्य कर्तृत्वशाली महाभागांची हिंदुस्थानांत साथ मिळाली. परंतु राजकीय स्वातंत्र्यप्राप्ति हें या राजकीय पुढाऱ्यांच्या आयुष्याचें मुख्य साध्य होतें. धार्मिक दृष्टीनें जीवनसाधना करावी हें ह्या राजकारणी पुरुषांचें ध्येय नव्हतें. महात्माजींच्या सत्य-अहिंसामय सत्याग्रहास ह्या राजकारणी लोकांनीं आपलें राजकारणाचें साधन बनविलें. सविनय कायदेभंग हें त्यांचें स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं केवळ अहिंसक तंत्र होतें. सत्याग्रह ही त्यांची धर्मसाधना नव्हती. महात्माजींस ज्या अत्यंत थोड्या कार्यकर्त्यांच्या हृदयांत, स्वराज्यप्राप्ति हें सत्य-अहिंसामय सत्याग्रहाचें साध्य नसून साधन आहे, अशा जाणिवेची ज्योत पेटवितां आली, त्यांत किशोरलालजी हे एक अग्रेसर समजले पाहिजेत. जरी स्वराज्यप्राप्तीसाठीं त्यांनीं आपला देह झिजविला तरी स्वराज्यप्राप्ति हें त्यांचें साध्य नसून ती पवित्र अशी धार्मिक साधना त्यांनीं बनविली होती. स्वराज्य हा त्यांच्या ' जीवनशोधना 'चा[1] मार्ग होता. ह्याच मंगलमय पवित्र जीवनासाठीं त्यांनीं ' गांधीविचारदोहन ' केलें, ' संसाराकडे धर्मदृष्टी 'नें त्यांनीं पाहिलें. ' स्त्री-पुरुषमर्यादा ' ओळखून आपल्या जीवनांत समूळ क्रांति केली. जन्मभर अहिंसेची विवेकपूर्ण छाननी केली. हेंच किशोरलालजींच्या व्यक्तिमत्त्वाचें वैशिष्ट्य आहे. महात्माजींच्या मृत्यूनंतर 'हरिजन'-चें संपादन ही किती कठोर अशी धर्मसाधना त्यांनीं बनविली हें ज्यांनीं ही साधना प्रत्यक्ष अवलोकन केली आहे त्यांसच तिचें योग्य आकलन होऊं शकेल. कोणाचीहि छाती दडपून जावी इतकें

---

१ श्री. किशोरलालजींचें पुढील वाङ्मय प्रसिद्ध आहे : ' जीवनशोधन ', 'गांधी-विचार-दोहन' ' संसार अने धर्म ', ' स्त्री-पुरुष-मर्यादा ', ' समूळी क्रांति ', ' केळवणीना पाया ', ' उधईनुं जीवन ', ' गांधीजी अने साम्यवाद ', ' गीतामंथन ', ' गीताध्वनि ' ( गीतेचा समश्लोकी गुजराती अनुवाद ), ' बिदाय वेळाए ' ( ' निरोपाच्या वेळीं '–जिब्रानच्या ' प्राफेट 'चा गुजराती अनुवाद ). याशिवाय त्यांनीं तुकारामांच्या अभंगांचा गुजरातींत अभंगछंदांतच अनुवाद केला आहे.








भयंकर स्वरूप त्यांनीं संपादकीय कार्यास दिलें होतें. जो संपादकीय आदर्श त्यांनीं आपल्यापुढें ठेवला होता आणि शरीराच्या जर्जर स्थितींत जे कष्ट ते सहन करतांना दिसत, त्यामुळें ह्या कांटेरी मुकुट स्वतःच्या डोक्यावर चढविण्यास, त्यांना मदत करण्याची तीव्र इच्छा असूनहि हंगामी काळासाठीं का होईना, कोणी क्वचितच पुढें होऊं शकला ! जबाबदारीच्या ह्या विलक्षण जाणिवेमुळें व सदसद्विवेकबुद्धीच्या सततच्या टोंचणीमुळें त्यांना अत्यवस्थ असतांना देखील 'हरिजन'चें संपादन अखेरपर्यंत पत्करावें लागलें. अत्यवस्थ प्रकृतीमुळें 'हरिजन'ची जबाबदारी सोडण्याची त्यांची मनापासून इच्छा असली तरी मृत्यूनें त्यांची 'हरिजन'पासून सुटका करीपर्यंत त्यांना विश्रांति मिळूं शकली नाहीं. आपल्या साधनेची इतक्या अंतिम थरापर्यंत त्यांनीं पराकाष्ठा केलेली होती.

## विवेक आणि साधना

ह्या जीवनव्यापी असामान्य साधनेचा उगम त्यांच्या कौटुंबिक परंपरागत धार्मिक वृत्तीपासून असावा असें म्हणण्यास जागा आहे. किशोरलालजी यांचें कुटुंब स्वामिनारायण-पंथाचें होतें. आणि ह्या स्वामिनारायण-पंथांतील कांहीं सज्जन अत्यंत श्रद्धावान्, गुरुभक्तिपरायण, आत्मसमर्पणशील वैष्णवभक्त असत. धार्मिक सोंवळेंओंवळें, खाण्यापिण्याचे कडक निर्बंध, ह्या स्वामिनारायण-पंथांतील अनेक लोक हल्लींच्या पाखंडी काळांतहि पाळतांना आढळून येतात. फक्त आचारधर्मावरच हिंदुधर्मीयांनीं व त्या धर्मांत अंतर्भूत झालेल्या अनेक पंथीयांनीं शतकानुशतकें आपलें लक्ष एकवटलेलें आहे. धर्माच्या बाह्य शरीराकडेच त्यांनीं सर्वस्वीं लक्ष दिलें. शरीरामधील प्राणाची पर्वा त्यांनीं केली नाहीं. स्वामिनारायण-पंथांतील गुरुभक्ति कोणत्या थरास ह्या पंथीयांनीं पोंचविली हें विशद करण्याची येथें जरूरी नाहीं. केवळ परंपरेस चिकटून राहण्याची अनेक शतकें संवय झाल्यामुळें प्राण आणि शव, जीव आणि प्रेत ह्यांमधील फरकहि या धार्मिक वृत्तीच्या लोकांच्या बुद्धीच्या कक्षेंत येईनासा झाला आहे. अशा स्वामिनारायण-पंथाची कर्मठ धार्मिक परंपरा, गुजराती सालस कुटुंबांत जन्म, वैश्य ज्ञातींतील आनुवंशिक लीन स्वभाव, वऱ्हाडांतील अकोला शहरांतील वास्तव्यांत भोंवतालचें महाराष्ट्रीय मध्यमवर्गीय वातावरण, उच्च इंग्रजी शिक्षण-ह्यांच्या अनेकविध सुसंस्कारांमधून किशोरलालजींच्या स्वभावाची वाढ झालेली होती. श्री. किशोरलालजी कुशाग्रबुद्धीचे व मेहनती विद्यार्थी म्हणून कॉलेजांत नाणावलेले होते. एल्‌एल्. बी. परीक्षा ते उच्च श्रेणींत पास झालेले होते आणि कायद्यांमधील शब्दांच्या व व्याख्यांच्या कांटेकोरपणाचें त्यांना चांगलें ज्ञान झालेलें होतें. सॉलिसिटरच्या परीक्षेची तयारी त्यांनीं चालविली होती. ह्याच काळांत 'भारतसेवकसमाजां'तील सभासद श्री. अमृतलाल ठक्कर किंवा ठक्करबाप्पा ह्यांचें आपणांस किती आकर्षण होतें त्याचा उल्लेख 'नवभारतां'तील (ऑक्टोबर १९४८च्या अंकांतील) आपल्या एका लेखांत त्यांनीं पूर्वीं केलेलाहि आहे. मूळची धार्मिक प्रवृत्ति, निरलस स्वभाव, पूर्ण निरहंकारित्व, विधायक कार्याची आवड यांमुळें महात्मा गांधींच्या विलक्षण व्यक्तिमत्त्वाची त्यांना ओढ लागणें अत्यंत स्वाभाविकच होतें. प्रारंभींच्या, ते साबरमतीस जाऊन राहण्याच्या काळांत किशोरलालजींच्या सुदैवानें श्री. केदारनाथजी यांच्याशीं त्यांचा गाढ परिचय झाला. आणि त्यांच्या धार्मिक प्रवृत्तीस डोळसपणाचें, विवेकाचें वळण लागलें. केदारनाथजींच्या अभावीं किशोरलालजींच्या धार्मिक प्रवृत्तीनें कोणती दिशा घेतली असती हें सांगतां येत नाहीं. धार्मिकतेची प्रत्येक श्रद्धायुक्त बाब विवेकाच्या कसोटीवर घासून पाहण्याची संवय श्री. केदारनाथजी ह्यांनीं त्यांना लावली, म्हणूनच श्री. केदारनाथजी ह्यांना मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें ते आपले धार्मिक मार्गदर्शक समजत. त्यांचा 'विवेक आणि साधना' हा ग्रंथ किशोरलालजी ह्यांनीं प्रसिद्ध केला आहे. आणि त्यांतील धार्मिक विचारांशीं किशोरलालजी ह्यांची सर्वस्वीं समरसता झालेली होती, असें समजण्यांत कांहींहि चूक नाहीं.

किशोरलालजी ह्यांच्या प्रखर धार्मिक साधनेमध्यें त्यांच्या पत्नी श्री. गोमतीबाई ह्यांचें जें साहाय्य झालें त्याचें यथातथ्य वर्णन कोणी करूं








# कै. किशोरलाल मशरूवाला यांची जीवनसाधना

शकेल कीं काय ह्याची शंका वाटते. किशोरलालजी आणि गोमतीबाई हें एक अद्‌भुत दांपत्य अर्वाचीन काळांत आपल्या समाजांत अवतरलें आहे, असें ज्यांना हें दांपत्य चिकित्सकपणानें जवळून पाहतां आलें, त्यांना वाटत असलें पाहिजे. आचार्य दादा धर्माधिकारी ह्यांचा ह्या दांपत्याशीं चांगला परिचय होता. किशोरलालजींच्या मृत्यूनंतरच्या भाषणांत धर्माधिकारींनीं असें अन्वर्थक विधान केलें कीं, आपल्या पुराण-ग्रंथांत ज्या अत्यंत विलक्षण अशा विभूतींचें चित्र काढलेलें दिसतें—ज्यांच्यावर प्राचीनपणामुळें आपला विश्वास बसूं शकत नाहीं आणि म्हणूनच ज्या विभूती पुराणकथात्मक ( Mythological) आपणांस वाटतात—तशा विभूती प्रत्यक्ष आपल्यांत सद्यःकालींहि वावरतात, हें किशोरलालजी व गोमतीबाई यांच्यासारख्या दांपत्यावरून कळून येतें. वाणी आणि अर्थ हे जसे एकमेकांस चिकटलेले असतात, ' वागर्थाविव संपृक्तौ ' अशी ज्याची कालिदासानें आपल्या दिव्य प्रतिभेनें व्याख्या केली आहे, अशा कोटींत बसण्यासारखें हें दांपत्य होऊन गेलें असें म्हणतां येईल.

## ज्ञानयोगी

जरी महात्मा गांधींची देशविषयक, धर्मविषयक, समाजविषयक आणि विश्वविषयक विचारसरणी किशोरलालजींस सर्वस्वीं पसंत पडली असली, तरी ते स्वतंत्रप्रज्ञतेनें विचार करीत असल्यामुळें त्यांना महात्माजींचे केवळ शिष्य किंवा अंतेवासी समजणें योग्य होणार नाहीं. किशोरलालजींसारखा आत्मनिष्ठ साधक कोणत्याहि दुसऱ्या महान् व्यक्तीशीं पूर्णपणें समरस होऊन आपलें आत्मवैशिष्ट्य गमावूं शकेल असें वाटत नाहीं. किशोरलालजींची भूमिका बव्हंशीं तत्त्वज्ञान्याची होती. ते केवळ कर्मयोगीहि नव्हते किंवा आत्मसमर्पण केलेले भक्तहि नव्हते. भक्ति आणि कर्म यांपेक्षां ज्ञानाचा आविर्भाव त्यांच्या व्यक्तिमत्त्वामध्यें अधिक प्रमाणांत होता असें म्हणतां येईल. प्रसंगविशेषीं महात्माजींशीं त्यांचे तीव्र मतभेद होते असें दिसून येईल. एकाच प्रसंगाचा येथें उल्लेख करण्यासारखा आहे. किशोरलालजी कांहीं वर्षें गांधी-सेवा-संघाचे अध्यक्ष होते. हुदली येथें भरलेल्या गांधी-सेवा-संघाच्या वार्षिक संमेलनप्रसंगीं महात्माजींशीं झालेल्या महत्त्वाच्या मतभेदामुळें ते राजीनामा देण्याचा हट्ट घेऊन बसलेले होते. संघांतील सभासदांना राजनिष्ठेची शपथ घेतां येणार नाहीं असें किशोरलालजींचें स्पष्ट मत होतें. कायद्यानें घेतली जाणारी शपथ ( Legal Oath ) आणि नैतिक शपथ (Moral Oath ) ह्यांमध्यें फरक आहे असा श्लेष निघून श्री. केदारनाथजींच्या मध्यस्थीनें हें तीव्र मतभेदाचें प्रकरण त्या वेळीं निकालांत निघालें हें खरें. परंतु त्यावरून किशोरलालजींच्या तात्त्विक, नैतिक व धार्मिक मनोवृत्तीवर चांगला प्रकाश पडण्यासारखा आहे.

जीवन ही एक साधना आहे, अशी किशोरलालजींची निष्ठा होती. साबरमतीच्या आश्रमांतील राष्ट्रीय पाठशाळेंत व विद्यापीठांत साध्या शिक्षकापासून आचार्यापर्यंत त्यांनीं कोणतेंहि काम अत्यंत ध्येयनिष्ठेनें, सहृदयतेनें व सहजतेनें केलें. किशोरलालजींनीं किती तरी विषयांचें विस्तृत, सखोल व सूक्ष्मज्ञान मिळविलेलें होतें. त्यांची बुद्धि सर्वतोमुखी, कुशाग्र व पृथक्करणात्मक होती. अनेक पुस्तकें व शेंकडों लेख त्यांनीं लिहिले. परंतु त्याला वाङ्मयोपासना ही संज्ञा देतां येणार नाहीं. ही त्यांची धर्मोपासनाच किंवा सत्योपासनाच होती !

त्यांचे सहकारी श्री. काकासाहेब कालेलकर ह्यांनीं त्यांना, त्यांची चिता जळत असतांना, जी श्रद्धांजलि दिली त्या वेळीं असें विधान केलें कीं, ' किशोरलालजी ह्यांनीं आपल्या जीवनांत सर्व वर्णांचे व सर्व आश्रमांचे गुण सामंजस्यानें एकत्रित केले होते.' गृहस्थाश्रम आणि संन्यास ह्यांचा ज्यानें समन्वय केला होता असा हा महापुरुष होता. मित्रनिष्ठा, पत्नीनिष्ठा, ईश्वरनिष्ठा अशा सर्व उदात्त ध्येयनिष्ठांची पराकाष्ठा त्यांनीं आपल्या जीवनांत आचरून दाखविली होती.

अशा महापुरुषाचें यथार्थ आकलन सध्यांच्या पिढीस होण्याइतकी तिची संस्कृति वाढलेली नाहीं. त्यांच्या मृत्यूंतून ह्या दिव्य संस्कृतीची स्फूर्ति व दीक्षा पुढील पिढीनें घ्यावी अशी आशा करून ही श्रद्धांजलि पुरी करणें योग्य होईल.









प्रा. दे. ज. हातेकर

# आचार्य किशोरलाल मश्रूवाला

किशोरलाल मश्रूवाला हे आचार्यांत आचार्य होते. आपल्या अचल निष्ठेनें, अहर्निश तात्त्विक चिंतनानें, अंगीं बाणलेल्या सात्त्विक वृत्तीनें त्यांनीं जो सदाचरणाचा आदर्श निर्माण केला त्यामुळें त्यांचें आचार्यपद इतर सर्वांना प्रेरक झाल्यास नवल नाहीं. ज्ञानी असून अत्यंत प्रेमळ, थोर असून कमालीचा विनम्र, विरक्त असून कर्मयोग आचरणारा, सदां कर्मरत राहूनदेखील किती मोकळा, अनेक संस्थांचा मार्गदर्शक असूनदेखील सर्व संस्थांपासून अलिप्त, शरीर जर्जर झालेलें असूनदेखील कोणत्याहि लहानमोठ्या सेवेला तत्पर राहणारा, प्रक्षोभकारक घटना घडली असली तरी बुद्धि अविचलित राखून सौम्यपणें उपाय सुचविणारा, कितीहि अन्य कामाचा ताण पडला व शरीर खिळखिळें झालेलें असलें तरी 'हरिजन'-चा अंक नेमका वेळेवर लिहून शेंकडों कार्यकर्त्यांचें मार्गदर्शन करणारा आचार्य आज (ता. ९–९–५२) देहानें विसर्जन पावला !

आचार्य मश्रूवाला यांना एखाद्या संस्थेचे सभासद होणें पसंत नसे. संस्था म्हटली म्हणजे संस्थेचें मर्यादित कार्यक्षेत्र, संस्थेचें विशिष्ट ध्येय व त्या ध्येयानुकूल नियमांचें बंधन मान्य करावें लागतें. संस्थेचा गाडा अशा शिस्तबद्ध सभासदांच्या आचरणानें पुढें जातो खरा, परंतु संस्थेच्या सभासदांना आपल्या संस्थेचा मोह व तज्जन्य अभिमान चिकटणें अधिक संभवतें. तटस्थ वृत्ति कायम ठेवून निर्विकार भावनेनें सहजप्राप्त कर्मे सतत करीत राहण्याचा ज्याच्या मनाला छंद लागला त्याला संस्थेच्या ठरीव चाकोरींतील कर्मे कशीं रुचतील ! असें असलें तरी आचार्यांच्या कणखर बाण्याला अखिलभारतीय संस्थांच्या संभारांत कर्मसंन्यास मानवणारा नव्हता. म्हणूनच आचार्य मश्रूवाला कोणत्याहि संस्थेचे अधिकृत सभासद न राहतां देखील वर्धेला गांधीजींनीं स्थापन केलेल्या सर्व अखिलभारतीय संस्थांच्या कार्यकारिणीचे प्रेरक व मार्गदर्शक गुरु होते. सेवा-संघाचे ते कित्येक वर्षे अध्यक्ष होते व त्या कारकीर्दींत त्यांनीं गांधी-सेवा-संघाच्या शुचितेचा आदर्श एवढा उंचावून धरला कीं, खुद्द गांधीजींनीं देखील आचार्यांची तात्त्विक बैठक मान्य केली. आचार्यांची तत्त्वनिष्ठा, आचारनिष्ठा आणि सत्यान्वेषी वृत्ति दिवसेंदिवस विकास पावत गेली. म्हणूनच त्यांची इच्छा नसतां देखील सर्व विधायक कार्यकर्त्यांचें न कळत पुढारीपण त्यांच्या गळीं पडलें. आचार्य मश्रूवाला यांची वर्धेच्या बजाजवाडींतील लहानशी खोली विधायक कार्यकर्त्यांचें मार्गदर्शनकेंद्र बनली, ती याच कारणामुळें होय.

बजाजवाडींतील गेस्ट हाऊसच्या एका खोलींत आचार्यांचें कित्येक वर्षांपासून वास्तव्य होतें. त्यांची खोली नेहमीं उघडी असावयाची. आचार्यांना भेटण्याची वेळ सामान्यपणें सायंकाळीं निश्चित ठरविलेली असली तरी विशेष प्रसंगीं सकाळीं देखील भेटतां येई. खोलींत प्रवेश केल्याबरोबर आचार्यांचें अविस्मरणीय मृदुस्मित व आदरातिथ्याला पुढें सरसावलेले हात पाहुण्याला योग्य स्थाननिर्देश करून नमस्काराकरितां वाकलेले आढळत. आचार्यांच्या खोलींतील थाट म्हणजे अक्षरशः असंग्रही वृत्तीचा नमुना म्हणून दाखवितां येई : 'हरिजन'च्या फाईलींचें भिंतीशीं उभें केलेलें एक लांकडी कपाट; कपाटाशेजारीं प्रचलित घडामोडींवर टिप्पणी लिहावयाला लागणारी चालू वर्तमान-पत्रांतील कात्रणांचीं फाईलें ठेवलेली रॅक; रॅक-शेजारीं आचार्यांचा बसण्याचा लांकडी पलंग; —पलंगावर टेकूचा आधार घेऊन आचार्य लेखनांत गुंतलेले दिसावयाचे— आचार्यांच्या पलंगाशेजारीं येणाऱ्या जाणाऱ्या पाहुण्यांच्या स्वागताकरितां ठेवलेला बेंच किंवा एखाद दुसरी खुर्ची; यापेक्षां अधिक साहित्य खोलींत आढळणार नाहीं. 'हरिजन'चे संपादक किती साध्या व कमी साधनांचा








अनुक्रमणिका

# आचार्य किशोरलाल मश्रूवाला

वापर करीत हें ज्यांनीं प्रत्यक्ष आचार्यांना त्यांच्या खोलींत पाहिलें असेल त्यांना चटकन् कळून येई.

महत्त्वाचा पत्रव्यवहार अथवा नव्या विषयावरील टिप्पणी आचार्य स्वतः लिहून काढावयाचे. अशा वेळेला आपल्या हाडकुळ्या मांडीच्या घडीवर लहानशी लांकडी फळी ठेवून त्यावर अडकविलेल्या कागदाचे रकाने ते इतक्या तन्मयवृत्तीनें भरून काढीत कीं, त्या वेळेला त्यांच्या तीव्र बुद्धिमत्तेचें व सूक्ष्म मनोव्यापारांचें स्पष्ट दर्शन आचार्यांच्या मनोरम विविध हालचालींवरून सहज होई. अशा वेळीं आचार्यांचा आजार पार पळून जाई. व यदाकदाचित् पाटीस लागलेल्या दम्याच्या विकारानें अशा वेळीं उचल खाल्लीच तर दमदार विचारांचें सूत्रबद्ध चक्र दम्यावर ताबडतोब मात करी आणि आचार्य लिहूं लागत. आचार्यांच्या लिखाणांत कधीं खंड पडत नसे तो याचमुळें होय.

आचार्यांचें बुद्धिसामर्थ्य चतुरस्र होतें. धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, समाजशास्त्र व राज्यशास्त्र यांसारख्या विषयांवर लिहितांना आचार्यांच्या लेखणीला जशी धार येई तशीच ती नवसमाजनिर्मितीच्या विविध विधायक कार्यक्रमांविषयीं संजीवनीचें चैतन्य निर्माण करी. आचार्यांचें लिखाण सत्यान्वेषी, शुचि, चैतन्यदायी होतें. आचार्यांची बुद्धि म्हणजे शास्त्रीय विश्लेषणाची प्रयोगशाळा ! ज्या ज्या विषयाला आचार्यांच्या बुद्धीनें स्पर्श केला त्या त्या विषयाची आचार्यांनीं इतकी साधी व सरळ फोड करून मांडणी करावयाची कीं, वाचणाराच्या ती सहज गळीं उतरावयाची. आचार्यांनीं 'हरिजन'मध्यें जसें स्फुट लिखाण लिहिलें तसे अनेक ग्रंथहि लिहिले. त्यांपैकीं 'गांधीविचारदोहन' आचार्यांच्या सूत्रबद्ध व सोप्या भाषाशैलीचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून सांगतां येईल. गांधीजींनीं या पुस्तकाची प्रस्तावना लिहितांना म्हटलें आहे कीं, या पुस्तकांत मांडलेल्या विचारसरणींतील एक शब्दहि मला बदलावयाचा नाहीं इतकी ती मांडणी परिपूर्ण आहे. आचार्यांची प्रज्ञा स्वतंत्र होती. स्वतःच्या बुद्धीला जें पटेल तें निर्भयपणें मांडण्यांत आचार्यांनीं कधीं माघार घेतली नाहीं. अलीकडील 'हरिजनां'-तील लेख या म्हणण्याची साक्ष देतील. सरकारचें औद्योगिक व आर्थिक धोरण, कॉंग्रेस पक्षाची सेवापराङ्मुखता व सत्तालोलुपता किंवा दुसऱ्या एखाद्या राजकीय पक्षाची हिंसात्मक वृत्ति यांवरील आचार्यांचे लेख निःस्पृह, निर्भय व सत्यान्वेषी वृत्तीचीं उदाहरणें म्हणून सांगतां येतील. आचार्यांच्या या सत्यशोधनाच्या हव्यासानें आचार्यांच्या लेखांतून चैतन्यकारी बौद्धिक आंदोलन सुरू होत असे. अनेक कूट प्रश्नांचा उलगडा होई व विधायक कार्याला चालना मिळे.

आचार्य किशोरलाल केवळ बौद्धिक आंदोलनाचे प्रणेते नव्हते. भिन्न बौद्धिक गुणांचें सामंजस्य त्यांनीं आपल्या आचरणांत साधलें होतें. बुद्धिवादी माणसांत कधीं न आढळणारी परमतसहिष्णुता आचार्यांनीं अशी आत्मसात् केली होती कीं, भिन्न विचारसरणींच्या अनेक थोरामोठ्यांनीं आचार्यांकडे धांव घ्यावी आणि सल्ला मागावा, अशी परिस्थिति आचार्यांच्या वागणुकीनें निर्माण झाली होती. कूटराजनीतिज्ञ, हिंसात्मक संघटनेचा पुरस्कार करणारे, सत्ताधारी, धर्ममार्तंड, पाश्चात्त्यसंस्कृतिनिष्ठ, भिन्न मताभिमानी असे सर्व प्रकारचे लोक आचार्यांचें म्हणणें समजावून घ्यावयाला एकत्र येत. यामुळें वर्धेची बजाजवाडी भिन्न मतप्रणालींच्या अनेक व्यक्तींचें परस्परविनिमयकेंद्र बनली.

आचार्यांना खाजगी जीवन असें कांहींच नव्हतें. आचार्यांचें जीवन म्हणजे 'ब्रह्मार्पणम्'! सारें जीवन आचार्यांनीं ईश्वरार्पण केलें होतें. आचार्यांना शेवटीं शेवटीं वाटूं लागलें होतें कीं, या कार्याच्या पसाऱ्यांतून मुक्त व्हावें आणि पूर्ण विश्रांति घ्यावी, जर्जर झालेल्या शरीराच्या वेदना विश्रांतीनें किंचित् कमी कराव्या. परंतु तसें होणारें नव्हतें. कर्में करीतच देहार्पण करण्याचें भाग्य त्यांना लाभावयाचें होतें ! म्हणूनच विनोबांनीं आपल्या संदेशांत लिहिलें कीं, 'देह शेवटीं किशोरलालभाईंना सोडून गेला ! किशोरलालभाईंची वृत्ति चिरंजीव आहे. त्या वृत्तीच्या जोपासनेनें किशोरलालभाई कायम राहणार आहेत.'

---

पुस्तक–परीक्षण

## हिंदी राज्यघटना : (तुलनात्मक परीक्षण, कलमवार स्पष्टीकरण, निवडणुकीसंबंधीं माहिती यांसह)

लेखक व प्रकाशक–श्री. भालचंद्र महेश्वर गुप्ते, एम्. ए. एलएल्. बी., सभासद, हिंदी घटनासमिति, पुणें ४. ( १९५१ ), किं. ८ रु. पानें ३५६.

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध काँग्रेस पुढारी श्री. बापूसाहेब गुप्ते यांनीं भारताच्या राज्यघटनेवरील हा ग्रंथ लिहून मराठी वाङ्मयांत निःसंशय भर टाकली आहे. मातृभाषेंतून शिक्षण देण्यासंबंधीं आतां दुमत नसलें तरी निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवरील ग्रंथ-सामग्री मातृभाषेंतून अद्याप उपलब्ध झालेली नसल्यामुळें, तत्त्व मान्य करूनहि तपशिलांत शिरतांना अनेक अडचणी पुढें उभ्या राहतात. राज्यघटनेच्या क्षेत्रांतील या अडचणी अंशतः दूर केल्याबद्दल श्री. बापूसाहेब गुप्ते यांना धन्यवाद दिले पाहिजेत.

राज्यघटनेसारख्या क्लिष्ट कायद्याचें सुबोध भाषांतर जरी मराठी वाचकांपुढें ठेवलें तरी ती स्वागतार्ह गोष्ट ठरते. प्रस्तुत ग्रंथांत हा उद्देश तर साध्य झालाच आहे; पण घटना-समितींतील चर्चेच्या अनुरोधानें निरनिराळ्या कलमांखालीं ज्या विस्तृत टीपा दिलेल्या आहेत त्यामुळें त्या त्या कलमांचा कार्यकारणसंबंध स्पष्ट होण्यास अधिकच मदत होते. कायद्याच्या पुस्तकाच्या संपादनांत अशा तऱ्हेच्या टीपा देणें ही एक आवश्यक बाब समजली जाते. पण दुर्दैवानें या प्रकारच्या बहुसंख्य पुस्तकांत दिलेल्या टीपा म्हणजे मूळ कलमांतील वाक्यें किंवा अर्ध-वाक्यें तुटक रीतीनें एकाखालीं एक मांडणें, इतकेंच संपादकाचें काम मानलें जातें. प्रस्तुत ग्रंथांतील या टीपा अशा स्वरूपाच्या नाहींत, ही गोष्ट मुद्दाम नमूद केली पाहिजे. इतर कलमांशीं संबंध, घटना-समितींतील चर्चेंत पुढें आलेले निरनिराळे पर्याय, त्यांवर घेतलेले निर्णय आणि त्यांची कारणमीमांसा यांसाठींच या टीपांचा उपयोग केला गेला असल्यामुळें ग्रंथाच्या उपयुक्ततेंत त्यामुळें भरच पडली आहे.

घटना अंमलांत आल्यानंतर तींत ज्या दुरुस्त्या करण्यांत आल्या त्यांचा समावेश ग्रंथांत त्या त्या ठिकाणीं केलेला असल्यामुळें, घटना मान्य झाल्याबरोबर प्रकाशित झालेल्या घटनेच्या भाषांतरापेक्षां प्रस्तुत ग्रंथास अधिक अद्ययावत्पणा प्राप्त झाला आहे. निवडणुक-कायद्यासंबंधीं शेवटीं जोडलेल्या पुरवणीमुळेंहि त्या अद्ययावत्पणांत भरच पडली आहे.

श्री. बापूसाहेब गुप्ते हे स्वतः घटनासमितीचे सभासद होते आणि अथपासून इतिपर्यंत तिच्या कामकाजांत विवेचकपणें भाग घेत होते, या गोष्टीची साक्ष प्रस्तुत ग्रंथाला जोडलेल्या विस्तृत प्रस्तावनेवरून कोणालाहि पटण्यासारखी आहे. घटना-शास्त्राच्या दृष्टीनें या प्रस्तावनेला ग्रंथांतील इतर भागापेक्षां सर्वांत अधिक महत्त्व दिलें पाहिजे. प्रस्तावनेंत भारताच्या राज्यघटनेची इतर देशांच्या राज्यघटनांशीं तुलना केलेली असून आपल्या घटनेचें वैशिष्ट्य वर्णिलेलें आहे. घटनेचें स्वरूप आणि तींतील कायदे-मंडळ, अंमलबजावणी करणारें सरकार आणि न्यायदान-पद्धति यांची आपल्या परिस्थितीच्या संदर्भांत चर्चा केली असून, सर्वसाधारणपणें घटना-समितीनें घेतलेले निर्णय योग्यच आहेत असा निष्कर्ष काढण्यांत आला आहे. पण हें करतांना कोठेंहि वृथाभिमान, फाजील अभिनिवेश किंवा स्वपक्षीयांचें सर्वथा समर्थन करण्याचा 'राजकारणी' मार्ग श्री. गुप्ते यांनीं अवलंबिलेला नाहीं ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, भारताच्या घटनाकारांना अभिनिवेशानें पुढें येऊन घटनेचें समर्थन करण्यास प्रवृत्त करणारें असें फारसें त्या घटनेंत नाहीं, ही गोष्ट श्री. गुप्ते यांनाहि पटलेली आहे. आणि त्यामुळेंच घटनेची प्रशस्ति करतांनादेखील ती बिचकत बिचकत केलेली आढळते. याचें एक कारण पृ. ५२ वर ग्रंथकर्त्यांनेंच दिलें आहे आणि तें असें "...एकंदर घटनेंतील तरतुदींबाबत असें म्हणतां येईल कीं, बऱ्याच बाबतींत माझे मतभेद होते..." :पुढें पृ. ६० वर श्री. गुप्ते म्हणतात: "घटना कशी आहे ? याचें








उत्तर एक घरगुती उपमा घेऊन असें देतां येईल कीं, ती दहाजणींसारखी आहे ”... तेव्हां तिच्यावर भाष्य करतांना ग्रंथकर्त्याची थोडी ओढाताण झाली असल्यास नवल नाहीं.

प्रस्तावनेंत घटनेवर आणि तदनुषंगानें घटनाकारांवर घेण्यांत येणाऱ्या आक्षेपांचें खंडन करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. परंतु या प्रयत्नांत ग्रंथकर्त्याचा मुख्य भर इतर देशांच्या घटनांचा तौलनिक दृष्ट्या विचार करून आपली घटना सर्वमान्य होण्याजोगी कशी आहे हें दाखवून देणें यावर आहे. कांहीं बाबतींत आपली घटना इतरांच्या मानानें कशी सरस आहे हेंहि विशद करण्यांत आलें आहे. पण या प्रयत्नामुळें वाचकांचें समाधान होतेंच असें म्हणतां येत नाहीं. एक तर ग्रंथकर्त्याची सारी मदार घटनेच्या औपचारिक, तांत्रिक ( formal ) स्वरूपावर आहे आणि दुसरें म्हणजे ‘ राष्ट्र’ची घटना असें तिचें वर्णन केलें असलें तरी ‘ काँग्रेस ’नें केलेली घटना असें तिचें अंतरंग आहे, ही गोष्ट ग्रंथकर्त्याला पदोपदीं नडल्याशिवाय राहत नाहीं. या दुसऱ्या प्रकारच्या अडचणीचा परिणाम कसा होतो हें निवडणूक-मंडळासंबंधींच्या तरतुदीबद्दल केलेल्या पुढील स्पष्टीकरणावरून दिसून येईल : “...आज देशांत सर्वत्र काँग्रेसचें राज्य आहे. घटनासमितींत काँग्रेसचें प्रचंड बहुमत होतें. तरीसुद्धां काँग्रेस पक्षानें आपल्या हिताच्या विरुद्ध ही तरतूद केली आहे, ही गोष्ट काँग्रेसच्या टीकाकारांनीं लक्षांत घेण्याजोगी आहे.” ( पृ. २७–२८ ). वाचकांच्या मनांत साहजिकच प्रश्न निर्माण होतो कीं, राष्ट्राचें प्रतिनिधित्व करणाऱ्या काँग्रेसचें ‘ स्वतःचें हित ’ विचारांत घेऊनच घटना-समितींतील निर्णय ठरले गेले कीं काय ? कांहीं बाबतींत स्वहिताविरुद्ध तसे इतर बाबतींत स्वहिताला पोषक असे निर्णय घेण्यांत आले कीं काय ? तसेंच, देशांत लोकशाही नांदावी यासाठीं करण्यांत आलेल्या निवडणूक-मंडळाची तरतूद काँग्रेसला ‘ आपल्या हिताच्या विरुद्ध ’ वाटते हें कसें ? का श्री. गुत्ते यांना असें सुचवावयाचें आहे कीं, घटना-समितींतील आपल्या बहुमताच्या जोरावर प्रत्येक निवडणुकींत काँग्रेसला हमखास यश येईल अशा रीतीनें निवडणुकींच्या व्यवस्थेची तरतूद केली असती तर ती रास्तच ठरली असती ?

पण त्याहिपेक्षां प्रस्तावनेचा सारा भर तांत्रिक तरतुदींवर असल्यामुळेंच तिला एक प्रकारचें वरवरचें स्वरूप प्राप्त झालें आहे. घटनेची पूर्वपीठिका देण्याच्या दृष्टीनें घटना-समितीची रचना, तिचें प्रातिनिधिक स्वरूप, तिची कार्यपद्धति, यांबद्दलची चर्चा प्रस्तावनेंत अपेक्षिली गेल्यास तींत वावगें कांहींच नाहीं. विशेषतः श्री. बापूसाहेब गुत्ते यांना घटना-समिति स्थापन झाल्यापासून तिच्यांतील निरनिराळ्या अंतःप्रवाहांची माहिती असल्यामुळें, त्या दृष्टीनें वाचकांची जिज्ञासा भागविणें त्यांना अशक्य नव्हतें. तसेंच, घटना-समितीपुढें आलेल्या प्रश्नांचा निकाल कोणत्या तत्त्वज्ञानाच्या आधारावर केला गेला या प्रश्नावरहि त्यांच्यासारख्या विवेचक लोकनेत्याकडून कांहीं प्रकाश पडला असता, तर ती गोष्ट निश्चित स्वागतार्ह झाली असती. काँग्रेसची चळवळ ही कांहीं केवळ राजकीय स्वातंत्र्याची चळवळ नव्हती. विशेषतः महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं तीमध्यें सामाजिक व आर्थिक पुनर्रचनेच्या मूलगामी कल्पना प्रामुख्यानें प्रसृत झाल्या. समाजप्रगतीची एक विशिष्ट दिशा आणि तिला पोषक असें एक विशिष्ट तत्त्वज्ञान काँग्रेस चळवळीनें पुढें आलें. या तत्त्वज्ञानाची छाप घटनासमितीच्या निर्णयावर कितपत पडली, कीं मुळींच पडली नाहीं, त्याचीं कारणें काय, वगैरे प्रश्नांचा ऊहापोह श्री. गुत्ते यांच्या प्रस्तावनेंत झाला असता तर बरें झालें असतें. श्री. गुत्ते आपल्या ग्रंथाच्या पुढील आवृत्तींत ही उणीव भरून काढतील अशी आशा करूं या. अर्थात्, आहे या स्वरूपांतहि राज्यघटनेच्या अभ्यासकांना मातृभाषेंत भारतीय राज्यघटनेवरील एक भारदस्त व उपयुक्त ग्रंथ उपलब्ध करून दिल्याबद्दल श्री. गुत्ते हे अभिनंदनास पात्र आहेत. त्यांच्या श्रमाचें चीज करून पुढील आवृत्ति शक्य तितक्या लवकर त्यांचेकडून बाहेर पडेल, अशी तरतूद करण्याचें कार्य मराठी वाचकांचें आहे.

---

प त्र व्य व हा र : श्री. प्रतापशेट

# ‘सहज स्थिति’ आणि बुद्धीची प्रक्रिया

पाश्चात्य तत्त्वज्ञानाचे विशेष व्यासंगी प्रा. प्र. रा. दामले, तसेच वेदान्तशास्त्राचे विशेष व्यासंगी आचार्यभक्त श्री. द. वा. जोग यांनीं माझ्या संकलित व्याख्यानांच्या पुस्तकाचा ‘नवभारता’च्या गेल्या जुलै १९५२ च्या अंकांत परामर्श घेऊन आपापले अभिप्राय व्यक्त केले आहेत, त्याबद्दल मी उभयतांचा फार आभारी आहे. मी व्यवसायानें शास्त्री अगर पंडित नाहीं. गुरुकृपेनें तत्त्वज्ञानाबद्दल अभिरुचि उत्पन्न होऊन तात्त्विक विचारांच्या मननामुळें वेळोवेळीं सुचलेले विचार ‘तत्त्वज्ञानसंस्थे’त जे मांडले गेले, ते सदर पुस्तकांत संकलित केले आहेत.

वरील माझ्या पुस्तकाच्या समीक्षणांतील कांहीं भाग श्री. दामले व जोग यांनीं ‘तत्त्वज्ञानसंस्थे’चा व माझा परिचय देण्यात, तसेंच पुस्तकांतील अवघड प्रमेयांचें सोप्या भाषेंत प्रतिपादन करणें किती कठीण आहे याचें वर्णन करण्यांत आणि माझ्या अवास्तव स्तुतींत घातलेला आहे. तेव्हां या भागाच्या बाबतींत मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं, एवढ्या गौरवाला मी पात्र नाहीं.

बाकी राहिलेल्या थोड्या भागांत उभयतांनीं आपआपल्या दृष्टिकोनानें कांहीं आक्षेप घेतले आहेत. सदर आक्षेपांचा यथामति खुलासा करण्याचा खालीं प्रयत्न केला आहे.

### प्रा. दामले यांचे आक्षेप

“बुद्धि खरोखर परोक्ष असेल तर ती इंद्रियानुभव अर्थवान् कसा करूं शकेल?” असा प्रा. दामले यांचा एक आक्षेप आहे.

त्याला माझें उत्तर असें : बुद्धीला परोक्ष असें पुस्तकांत कोठेंहि म्हटलेलें नाहीं. उलट, इंद्रियें, बुद्धि व शरीर यांना ‘आत्मीयकरणें’ म्हणून म्हटलेलें आहे. सदर पुस्तकांत परोक्ष हें विधान बुद्धीच्या विषयासंबंधीं केलेलें आहे. इंद्रियानुभव अर्थवान् करतेवेळीं आपली बुद्धि नेहमीं परोक्ष ज्ञानच देत असते. व परोक्ष ज्ञान हेंच अर्थवान् होतें. अपरोक्षांत अर्थ असत नाहीं.

प्रा. दामले यांचा दुसरा आक्षेप असा कीं “बुद्धीची चूक ज्ञानांत समजते याचा अर्थ काय?”. त्याला माझें उत्तर असें : बुद्धि वस्तूला विपर्यस्त करूनच ती वस्तु आपल्यासमोर ठेवते. परंतु अनुभवाच्या साहाय्यानें ज्ञानास बुद्धीनें विपर्यस्त केलेल्या वस्तूचें खरें स्वरूप समजतें. म्हणून सामान्यबुद्धि व ज्ञान हीं वेगवेगळीं धरलीं आहेत. पुढील आक्षेप नं. ३ च्या खुलाशांत हें अधिक स्पष्ट झालेलें आहे.

प्रा. दामले यांचा तिसरा आक्षेप असा कीं, “ज्ञान येतें व जातें, अनुभव आपणापाशीं राहतो, या विधानावरून ज्ञान व अनुभव हीं अगदीं वेगळीं अस्तित्वें आहेत असें वाटतें. पण तसें खरोखर आहे काय?”

याला उत्तर असें : होय, अनुभव आणि ज्ञान हीं अगदीं वेगवेगळीं आहेत. क्रियांचें ज्ञान होण्यापूर्वी सहजस्थितींत ज्या क्रिया असतात त्या अनुभवस्वरूप असतात व त्या ज्ञानांत आल्यानंतर ज्ञानाच्या विषय होतात.

प्रा. दामले यांचा चौथा आक्षेप असा कीं,

“क्रियांचें किंवा वस्तूंचें नैसर्गिक स्वरूप व ज्ञानानंतर होणारें त्यांचें विकृत स्वरूप असली शब्दयोजना तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांत सर्वसाधारण असली तरी विचारा-अंतीं सदोष ठरते. ज्ञानानें खरोखरी वस्तूला स्वरूप येतें, अर्थ येतो; मग ज्ञान विकृत कसें? ‘नैसर्गिक स्वरूप’ या शब्दप्रयोगाला कांहीं अर्थ आहे काय?”

त्यावर माझें उत्तर असें : होय. ‘नैसर्गिक स्वरूप’ या शब्दप्रयोगाला अर्थ आहे. परंतु तो बुद्धीच्या प्रक्रियेनें येणारा सापेक्ष अर्थ नाहीं. नैसर्गिक स्वरूप हें बुद्धीनें गुण लावण्याच्या अगोदरचें असतें. सहजस्थितींतल्या आमच्या सर्व क्रिया बुद्धींत येण्याच्या आधीं परमात्मस्वरूप म्हणजे निसर्गरूपच असतात; व म्हणूनच त्यांना ‘नैसर्गिक’ म्हटलें आहे. सदर क्रिया बुद्धि-








प्रयुक्त नसल्यामुळें त्यांना मनुष्यकृत अथवा कृत्रिम म्हणतां येणार नाहीं.

प्रा. दामले यांनीं असेंहि म्हटलें आहे कीं,

" पाश्चात्त्य व पौर्वात्य या दोन्हीं तत्त्वज्ञानांच्या इतिहासाचें नीट अवलोकन केल्यास एकंदर आध्यात्मिक तत्त्वविचारांचा पगडा तत्त्वज्ञानविषयक विचारसरणीवर अधिक दिसला, तरी वस्तुवादी, जडवादी व अनेकसत्तावादी दर्शनांतील भूमिका विचारार्ह आहेत, असें पटल्याशिवाय राहत नाहीं. त्या दृष्टीनें प्रतापशेट यांच्या ग्रंथाचें परीक्षण केल्यास त्यांत अनेक वादग्रस्त प्रश्नांचा विचार करावा लागेल. "

या वरील उताऱ्यांत श्री. दामले स्पष्ट कबूल करतात कीं, पौर्वात्यच काय परंतु पाश्चात्त्य विचारसरणीवर देखील आध्यात्मिक तत्त्वविचारांचा पगडा अधिक दिसतो. याचा अर्थ हाच कीं, आध्यात्मिक तत्त्वविचार म्हणजे आत्मविचार हेच अंतिम फलदायी होत, मूलतत्त्व अगर सत्य आत्मविचारांतच सांपडेल, वस्तुवाद, जडवाद, अनेकसत्तावाद इत्यादि अनात्मविचार या दृष्टीनें निरुपयोगी आहेत असें पौर्वात्यांनाच काय परंतु पाश्चात्त्यांनाहि वाटावयाला लागलें आहे. हें प्रा. दामले यांना मान्य आहे. पण ही गोष्ट कबूल केल्यावरदेखील प्रा. दामले म्हणतात कीं, वस्तुवादी, जडवादी व अनेकसत्तावादी या अनात्मविचारांच्या भूमिकादेखील विचारार्ह आहेत. परंतु अध्यात्मविचाराचा अवधि किंवा शेवट सत्यच आहे, म्हणजे अध्यात्मविचार हे सत्याप्रतच जाऊन पोहोंचतात असा ज्यांना पूर्ण अनुभव आला आहे, त्यांना वस्तुवाद, जडवाद व अनेकसत्तावाद विचारार्ह वाटतील असें मला तरी वाटत नाहीं. सदर अनात्मविचार निरुपयोगी समजून आत्मविचाराच्या पायावरच माझें पुस्तक लिहिलेलें आहे, तेव्हां माझ्या पुस्तकाच्या परीक्षणांत अनात्मवाद्यांना अनेकच काय परंतु माझीं सगळींच विधानें वादग्रस्तच वाटणार! कारण माझी दृष्टि निराळी व त्यांची दृष्टि निराळी.

### आचार्यभक्त श्री. जोग यांचे आक्षेप

श्री. जोग यांचा एक आक्षेप असा कीं, "अत्यंताभाव हा शब्द जेथें जेथें आला आहे तेथें तेथें तो खटकल्याशिवाय राहत नाहीं. "

त्यावर माझें उत्तर असें : अत्यंताभाव या शब्दाचा अर्थ मी असा समजतों कीं, ज्या अभावाला सापेक्षभाव नाहींतो. असा सापेक्षभाव जर असला तर त्याला अत्यंताभाव कसें म्हणावयाचें ? श्री. जोग मुंबईत असलेल्या देवदत्ताचा पुण्यांत अत्यंताभाव आहे असें समजतात; म्हणजे त्यांची अत्यंताभावाची कल्पना सापेक्षभावाची दिसते. परंतु माझ्या पुस्तकांत सापेक्ष जगाचें जेथें अभावरूपानेंदेखील भान नाहीं अशा ' निरपेक्ष ' ' केवल ' व 'निर्विकल्प' अशा अर्थानें मीं अत्यंताभाव हा शब्द वापरला आहे.

श्री. जोग यांनीं असें म्हटलें आहे कीं, " जिच्यांत बुद्धि आजिबात बंद राहते व फक्त इंद्रियांचे व्यापार चालू राहतात तिलाच शेटजींच्या मतें ' सहजस्थिति ' असें म्हणतात. "

परंतु वरील विधानांत माझें म्हणणें बरोबर मांडलें गेलें नाहीं. सहजस्थितीमध्यें बुद्धि आजिबात बंद राहते असें म्हणण्यांत 'बुद्धि कोणती ' हें चांगलें लक्षांत घेतलें पाहिजे. निरपेक्ष वर्तमानकालांतील बुद्धीची क्रियादेखील सहजस्थितींतच असते, कारण ती त्या वेळीं विषयरूप नसते. परंतु त्याच बुद्धीच्या क्रियेला जेव्हां बुद्धि ' मी अमुक विचार केला ' असा विषय करते, तेव्हां भूतकालीन स्वरूपाचें विषयरूप ज्ञान बुद्धीला होतें. अशा प्रकारची आपल्याच विचारांना विषयस्वरूप देणारी बुद्धीच सहजस्थितींत बंद असते.

---

## लो. टिळकांच्या जीवनाचा संदेश

चाळिसगांव येथील ' प्राथमिक-अध्यापक-विद्यालय ' या संस्थेंत हस्तलिखित नियतकालिक निघत असतें. त्या नियतकालिकाच्या संपादकांनीं आचार्य विनोबा यांस ' लो. टिळकांच्या जीवनाचें स्फूर्तिदायक वैशिष्ट्य कोणतें ? " याविषयीं विचारलें होतें. त्याला पुढील सूत्रमय उत्तर आ. विनोबांनीं पाठविलें : ' टिळकांचें देशप्रेम, टिळकांचें धैर्य, टिळकांचें अध्ययन एवढें आम्हांस पुरेसें आहे. '








# भारत आणि विश्वशांति

म. म. द. वा. पोतदार

[पेकिंग येथें भरणाऱ्या आशियाई शांतता-परिषदेच्या निमित्तानें पुणें येथें ७ सप्टेंबर १९५२ रोजीं शांतता-परिषद् भरली होती. सभेच्या निमंत्रकांत डॉ. र. पु. परांजपे, प्रा. स. वा. कोगेकर, श्री. कृ. ना. फडके, श्री. शं. शां. मोरे, श्री. वा. ब. गोगटे, श्री. भा. म. गुप्ते, सौ. मालतीबाई बेडेकर इत्यादि मंडळी होती. परिषदेचें उद्घाटन सुप्रसिद्ध सिनेमा-नट बलराज सहानी यांनीं केलें. परिषदेचे अध्यक्ष म. म. द. वा. पोतदार हे होते. त्यांनीं या परिषदेच्या अध्यक्षपदावरून जें भाषण केलें तें पुढें दिलें आहे :]

जगांत शांतता नांदावी ही मानवी जीवनाची आजची सर्वप्रथम गरज आहे. गेल्या पंचवीस-तीस वर्षांत म्हणजे माझ्या उभ्या आयुष्यांतील अर्ध्या काळात मीं जगांत झालेलीं दोन महायुद्धें पाहिलीं. अपरिमित संहार आणि विनाश जगानें पाहिला. तरीहि तिसरें युद्ध जवळ येत आहे कीं काय, हें भय अधूनमधून मनाला धसका देऊन जातेंच! पहिल्या युद्धापाठीमागून दुसरें युद्ध आलें. पण पहिल्या युद्धाच्या वेळीं जितकीं संहारक शस्त्रास्त्रें ठाऊक झालीं होतीं त्यांपेक्षांहि महाभयंकर आणि केवळ प्रलयकारी शस्त्रास्त्रांची भर त्या संभारांत घालण्यांत आली. जपानच्या भूमीवर या नवीन अस्त्रांचा जो प्रयोग झाला त्यांत कोसकोस वसलेली सर्व प्रजा क्षणार्धांत जळून खाक झाली. एवढ्यावर तृप्ति न होतां याहूनहि प्रबलतर अस्त्रांची निर्मिति केल्याची घोषणा अभिमानानें केल्याचें जगानें ऐकलें. अस्त्रांच्या या अतिसंहारक शक्तीच्या भयामुळें तीं वापरून सर्वनाश साधण्याचें धैर्यच कोणास होणार नाहीं, अशी आशाहि कोणी कोणी प्रगट करीत आहेत.

अमेरिकेच्या अध्यक्षपदासाठीं उभे असलेले आणि गेल्या महायुद्धांत सरसेनापति म्हणून गाजलेले अमेरिकन सेनापति आयसेनहॉवर यांनींदेखील दोन-तीन दिवसांपूर्वीं बोलतांना विश्वशांतीचें धोरण पुरस्कारिलें आहे. त्यांनाहि विश्वयुद्धाची शक्यता वाटत नाहीं. ते म्हणतात :

"Seven years after victory in World War two, this Administration has bungled us perilously close towards War three. Lest this be labelled a partisan charge, let me quote the words spoken last May by the Democratic Speaker of the U. S. House of Representatives. Mr. Rayburn solemnly told Congress : 'I think, the world is in the worse condition so far as hope for peace is concerned, than any one now living has seen when we were not in in actual war.' असें म्हणून आयसेनहॉवर यांनीं सांगितलें कीं अमेरिकन लोकांना युद्ध नको आहे. आजच्या परिस्थितींत जागतिक युद्धांत जय अशक्य आहे. ते म्हणतात :

"In this atomic age at this time of terrifying new weapons, victory was impossible in a global conflict... The unleashing of such a war would be a loss from which the world could not recover even in a thousand years." भावी प्रलयंकारी युद्ध झालेंच तर विजय कोणासच मिळणार नाहीं. मात्र जगाचा एवढा प्रचंड विनाश होईल कीं, एक सहस्र वर्षपर्यंत झालेली हानि जग सांवरूं शकणार नाहीं.

तेव्हां असलें जगबुडवें युद्ध घडून येऊं नये म्हणून जगांतील सर्व प्रजाजनांनीं एकमतानें आणि दृढ निश्चयानें प्रयत्न करावयास नकोत काय? धर्म, जात, पक्ष वगैरे सर्व भेद घटकाभर बाजूस ठेवून सर्व प्रजांनीं आपली घोषणा उच्च स्वरानें जगाच्या कानीं घातली पाहिजे. सर्व विश्व त्या शांतिघोषानें दुमदुमवून टाकिलें पाहिजे.

मागील युद्धानंतर जगांतील अनेक राष्ट्रांतील विचारवंतांची एक संघटना एकमेकांना साहाय्य करण्यासाठीं, एकमेकांची प्रेममय मैत्री साधण्यासाठीं एकमेकांत ज्ञानाची देवघेव करण्यासाठीं निर्माण झाली. ही संघटना 'युनेस्को' या नांवानें ओळखली जाते. यास 'आपण विद्या-विज्ञान-विनय-वितरक-संघ' असें नांव देऊं. 'विविविसं' असा याचा संक्षेप



अनुक्रमणिका

होईल. या संघटनेच्या प्रास्ताविक घोषणेचें सूत्र हें आहे :

" Since wars begin in the minds of men, it is in the minds of men that the defences of peace must be constructed. "

म्हणजे सर्व युद्धांचें उगमस्थान ज्या पक्षीं मानवी मनांत आहे, त्या पक्षीं शांतीचीं बीजेंहि तेथेंच रुजूं घातलीं पाहिजेत. लोकांचीं मनें शांतिप्रवण केलीं पाहिजेत. अशी शांतिप्रेरक जागृति लोकशिक्षणानेंच घडून येणें शक्य आहे. यासाठींच आजच्यासारख्या सभा, परिषदा वगैरेंची आवश्यकता आहे.

आपला भारत सर्व जगांतील एक प्राचीन महादेश आहे. शांतीचा संदेश आमच्या प्राचीन द्रष्ट्या ऋषींनीं आज हजारों वर्षांपासून आम्हांस ऐकविलेला आहे. 'सर्वे भद्राणि पश्यन्तु' ही आमची प्राचीन जगत्कल्याणसाधक प्रार्थना आहे.

भारतासारखा त्याचा शेजारी चीन हाहि प्राचीन महादेश आहे. या उभय देशांनीं संस्कृतीचें व लोक-जीवनाचें पोषण आणि संवर्धन जितक्या शांतीनें आज सहस्रों वर्षें केलें तितकें दुसऱ्या कोणीं क्वचित्‌च केल्याचा दाखला दाखवून देतां येईल.

एकाच प्रश्नाचें उत्तर विचारलें असतां वरील विधानांतील सत्य प्रगट होईल. भारत आणि चीन, आणि त्यांतल्या त्यांत भारत यांच्याकडून बाहेरील जगास कितपत उपसर्ग पोंचला ? चीनचा संबंध पूर्वकालीन मोंघल, हूणादिकांशीं कोणीं जुळवील ! पण आम्ही ? आम्ही भारतांत आपलें जीवन असें कंठिलें कीं, शेजाऱ्याला निष्कारण भय, त्रास किंवा त्याचें अपहरण वा शोषण करण्याचा आम्ही कधींच यत्न केला नाहीं. उलट आमच्यावरच इतरांनीं बाहेरून येऊन आमचें शोषण केल्याचेंच दाखवून देतां येईल. म्हणून शांतीची घोषणा करण्याचा आमचा अग्रहक्क आहे आणि तो कदीम म्हणजे पुरातनाचा आहे. आमचें 'बुनियादी'चें नाणें आहे. त्यांतून आजच्या घटकेला आमचा शस्त्रसंभार एवढा अल्प आहे कीं, जगांतील प्रबळ राष्ट्रांच्या मानानें आमची गणना निःशस्त्र देशांतच केली जाते ! मग आमच्यापासून भयाची शंका यत्किंचि-त्‌हि संभवत नाहीं. म्हणून आमची शांतिघोषणा निर्भेळ, शुद्ध आणि निष्पाप ठरेल आणि तिचा अधिक विश्वास पटेल अशी आशा वाटते.

शांतीचा निश्चय ही मुख्य गोष्ट. ती जगांत कशी स्थापावी हा पुढला प्रश्न. तो किती गुंता-गुंतीचा आहे हें सांगावयास नको. तेथें एकमत एकदम कसें होईल ? पण प्रथम तशी ' बुद्धि ' निर्माण केली पाहिजे. कारण—

" एकं हन्यान्न वा हन्यादिषुर्मुक्तो धनुष्मता ।
बुद्धिर्बुद्धिमतोत्सृष्टा हन्याद्राष्ट्रं सराजकम् ॥ "

असें विदुराचें नीतिवचन लक्षांत घेण्यासारखें आहे. इतकें बुद्धीचें अथवा विचाराचें सामर्थ्य आहे. माझा विश्वास आहे कीं कोणत्याहि ' अणुध्वं ' इत्यादि अस्त्रांपेक्षांहि विचारास्त्र अधिक प्रभावी असतें. युनेस्कोची तीच श्रद्धा आहे.

प्रत्यक्ष यश संपूर्णतया प्राप्त होणें ही अशक्य किमया आहे. तरीहि ज्या देशांत भगवान् बुद्धानें धर्मचक्राचें प्रवर्तन केलें, ज्या देशांत राज्यभोग तुच्छ मानून ' भैक्ष्य ' स्वीकारण्यास अर्जुन उभा राहिला, ज्या देशांत धर्म्य युद्धाची मीमांसा कर-णारा कृष्णप्रभु जन्मला, ज्या देशांत शक्ति, युक्ति आणि भक्तीचा त्रिवेणी संगम साधण्याची किमया रामदासानें उपदेशिली, ज्या देशांत 'भूतांच्या पाळ-णाच्या दये'चा खरी मर्यादा सांगणारा तुकाराम होऊन गेला आणि ज्या देशांत गीतेची कास धरून हिंसा-अहिंसेच्या मर्यादा दाखविणारे टिळक-गांधी-सारखे व्रती आणि त्यागी थोर पुरुष होऊन गेले तोच देश या जगांत शांतीची वात घरोघरीं लावील !

घोषणेचा प्रांत संपून, विचारामागोमागच्या कर्माचा प्रांत लागतो तेव्हां श्री. बाजपेई परवां म्हणाले तसें " Politics is the art of the possible " ही मर्यादा दिसूं लागते. पण पहिल्या टप्प्यांत त्याचा प्रश्न संभवत नाहीं. —आज येथें मी तरी या भावनेनें आलों आहे. माझ्या मनांत जगच्छांतीचा नंदादीप तेवत आहे. मग त्या नंदादीपाची वात सारण्याला कोण उभा आहे आणि तुपाची धार कोण सोडीत आहे इकडे लक्ष देण्याचें तादृश प्रयोजन नाहीं. ॐ शांतिः शांतिः शांतिः ।








# सार संकलन

## श्री. करमरकर यांचें 'प्राणिशिल्प'

सुप्रसिद्ध शिल्पकार श्री. वि. पां. उर्फ नानासाहेब करमरकर यांचा षष्ट्यब्दपूर्तीनिमित्त गौरव गेल्या १६ ऑगस्टला मोठ्या समारंभानें करण्यांत आला. श्री. करमरकर यांच्या ६१ व्या वाढदिवसाच्या निमित्तानें श्री. द. ग. गोडसे यांनीं 'मौज' (ता. २०-८-५२) मध्यें एक मार्मिक लेख लिहिला असून त्यांत करमरकरांच्या प्राणिशिल्पावरील असामान्य प्रभुत्वामागील इंगित प्रकट केलें आहे. त्या लेखांतून पुढील भाग उद्धृत केला आहे :

"प्रसिद्ध शिल्पकार करमरकर यांना प्राणी बाळगण्याचें अतिशय वेड आहे. प्राणिमात्रांवर निष्काम आणि निर्व्याज प्रेम करणें हें नानांच्या जीवनांतील एक महत्त्वाचें सूत्र आहे. मुक्या प्राण्यांनाहि त्यांचा एकदम लळा लागतो. मोर, मांजर, बकऱ्या, ससे, गायी, बैल, हरीण, कुत्रीं—अशा भिन्न भिन्न वृत्तींच्या प्राण्यांची नानांवर मात्र सारखीच माया असल्याचें दिसतें. अतिभयंकर म्हणून नांवाजलेलीं कुत्रीं नानांशीं मात्र अत्यंत प्रेमळपणानें वागल्याचीं उदाहरणें आहेत.

"तसें पाहिलें तर नानांनीं प्राणिशास्त्राचा गहन अभ्यास केला आहे अथवा प्राण्यांची सांकेतिक भाषा त्यांना अवगत आहे, असें नाहीं. इतरांशीं आपण बोलतों त्या घरगुती भाषेंतच ते त्यांच्याशीं बोलतात. परंतु आश्चर्य हें कीं, त्या बोलण्याचा आशय त्या प्राण्यांना मात्र चटकन् व अचूक समजतो व ते त्याप्रमाणें निमूटपणें वागतात. नाना म्हणतात : 'या मुक्या जगांत भाषेपेक्षां भावनेच्या जिव्हाळ्याला अधिक किंमत असते.'

"एकदां असेंच एक मांजर त्यांच्या दारांत येऊन बसलें. अनाथालयांत आश्रयाकरितां अर्ज घेऊन येणाऱ्या अर्जदाराचीं दीनवाणीं लक्षणें त्याच्या चेहऱ्यावर नानांना स्पष्ट दिसत होतीं. मांजर पाहिल्यावर निशा व हिरा या त्यांच्या कुत्र्यांनीं तिच्या रोखानें झेप घेतली. परंतु नानांनीं त्यांना वेळींच आवरलें. मांजरीला त्यांनीं जवळ घेतली, तिच्या पाठीवरून हात फिरवून तिचा अर्ज मंजूर झाल्याचें तिला सुचविलें आणि कुत्र्यांना स्पष्ट बजावलें : 'हिऱ्या, निशा, आजपासून ही आपल्याकडे राहणार आहे, बरं का! तिला कोणत्याहि तऱ्हेचा त्रास द्यायचा नाहीं!' आपल्या हातची शिकार गमावली म्हणून हिरा-निशांनीं थोडीशी कुरबुर केली, परंतु नानांच्या सक्त ताकिदीचें उल्लंघन करण्याची त्यांची छाती झाली नाहीं. नाना सांगतात, त्या मांजराच्या केंसालासुद्धां त्या कुत्र्यांनीं धक्का लावला नाहीं!...

"प्राण्यांवरील त्यांची ही भक्ति पाहिली कीं, प्राण्यांचीहि त्यांच्यावर एवढी उलट भक्ति कां जडते याचा उलगडा होतो. नानांच्या वागणुकींतील प्रेम व प्रामाणिकपणा हीं त्याचीं कारणें आहेत. नानांच्या मतें, प्राण्यांच्या जगांत या दोन गोष्टींना फार महत्त्व आहे. प्राण्यांवर खरें प्रेम केलेंत तर त्या प्रेमाची परतफेड ते मुके जीव तुमच्यावर सवाई प्रेम करून करतात. त्या प्राण्यांच्या जगांत ढोंगाला कुठेंहि जागा नाहीं. त्यांचीं प्राणेंद्रियें इतकीं तीक्ष्ण असतात कीं, ढोंग त्यांना तेव्हांच ओळखतां येतें. त्यांच्यावर प्रेम करणाऱ्या माणसाबद्दल त्यांना प्रेम वाटतें, परंतु प्रेमाचें सोंग आणणारा माणूसहि ते तात्काळ ओळखतात. प्रामाणिकपणें रागावणारा माणूसहि त्यांना आवडतो, परंतु रागाचें सोंग आणणाऱ्याबद्दलहि त्यांना तेवढीच चीड असते. प्रेम आणि प्रामाणिकपणा हे गुण मनुष्य आणि प्राणी यांच्या मैत्रींतील अत्यंत महत्त्वाचे दुवे आहेत. या दोन्ही गुणांच्या कसोटीला तुम्ही उतरलांत कीं त्याची सव्याज परतफेड करण्यांत ते मुके पण मानी जीव तेवढेच जागरूक असतात, असा नानांचा अनुभव आहे.

"शिल्पकार करमरकरांचें 'प्राणि-शिल्प' या दृष्टीनें महत्त्वाचें वाटतें. तें एवढें श्रेष्ठ आहे याचें कारण प्राणिमात्रांवरील त्यांचें प्रेम हेंच त्या शिल्पाचें अधिष्ठान आहे. करमरकरांच्या इतर शिल्पावर अनेक संप्रदायांचे संस्कार झालेले आढळतील. परंतु








प्राणिशिल्पाची त्यांची भूमिका मात्र निश्चित आहे. प्राणिशिल्पाबाबत त्यांचा दृष्टिकोन भूतमात्रावर प्रेम करण्यास शिकविणाऱ्या भारतीय संस्कृतीचा आहे. प्राणिमात्रांत दिसून आलेल्या देववृत्तीचा साक्षात्कारच त्यांनीं आपल्या शिल्पांत साकार केला आहे.

"करमरकरांचें शिल्पकलेवरील प्रभुत्व असामान्य आहे. शिल्पकलेच्या तंत्राचे ते 'उस्ताद' आहेत. शिल्पकलेच्या तंत्रावरील प्रभुत्वाची साक्ष त्यांची कोणतीहि कलाकृति देऊं शकेल. शिल्पकार म्हणून तर ते श्रेष्ठ आहेतच, परंतु माझ्या मतें प्राणि-शिल्पकार म्हणून ते त्याहिपेक्षां श्रेष्ठ आहेत. इतर शिल्पकृतींपेक्षां प्राणिशिल्पामध्यें करमरकर अधिक स्वतंत्र, अधिक समरस होतात. शिल्पवस्तुविषयीं वाटणारी त्यांची आत्मीयता एवढी तीव्र असते कीं, त्यांचें हें शिल्प म्हणजे प्रत्यक्ष आत्मीयताच साकार करण्याचा प्रयत्न असतो! अव्यक्ताला व्यक्त करण्याच्या या साधनेंत निर्माण झालेलें शिल्प तंत्रापलीकडचें ठरतें. करमरकरांच्या शिल्पकृती या दृष्टीनें न्याहाळल्यास वरील विधानाची प्रचीति येईल! विशेषतः त्यांनीं केलेलें अल्सेशिअन कुत्रीचें शिल्प या दृष्टीनें अनुपम आहे. ती एक श्रेष्ठ कलाकृति आहे. प्राणिमात्राचे सर्व गुणविशेष या शिल्पकृतींत एवढ्या आत्मीयतेनें, एवढ्या तंत्रसिद्ध सहजतेनें व एवढ्या हळुवारपणानें सूचित झाले आहेत कीं, ही शिल्पकृति म्हणजे निव्वळ त्यांच्या आवडत्या कुत्रीची प्रतिमा न ठरतां सबंध प्राणिमात्राचें, मनुष्य आणि प्राणी यांच्या सहानुभव मैत्रीचें स्मारक ठरतें! प्रत्यक्ष विधात्याला हेवा वाटावा एवढी ही कलाकृति श्रेष्ठ आहे. शिल्पकार करमरकरांचें श्रेष्ठत्व यांतच आहे."

## सवाई गंधर्व हरपले!

सप्टेंबर १९५२ च्या १२ तारखेस श्री. रामभाऊ कुंदगोळकर ऊर्फ सवाई गंधर्व आपल्या वयाच्या ६७ व्या वर्षीं इहलोक सोडून गेले. त्यांच्या कले-संबंधीं एक मार्मिक लेख श्री. केशवराव भोळे यांनीं 'साधने'च्या (२०।९।१९५२) अंकांत लिहिला आहे. त्यांतून पुढील भाग उद्धृत केला आहे :

"रामभाऊ अब्दुल करीमखांसाहेबांचे गंडाबंद शागीर्द झाले. खांसाहेबांच्या बरोबरच राहून त्यांनीं शिक्षणास आरंभ केला. आवाज फुटला तेव्हां खांसाहेबांनीं त्यावर रोज मेहनत करून तो गोल व मुलायम करून घेतला. या काळांत रामभाऊंकडून त्यांनीं अतिशय मेहनत करून घेतली. नित्यकर्में करण्याचा वेळ सोडल्यास रामभाऊ तंबोऱ्यावर अहोरात्र रियाज करीत असत. या मेहनतीनें सर्वस्वीं प्रतिकूल झालेल्या आवाजाचे खडक फोडून त्यांनीं आपल्या गळ्यांतून निर्मळ स्वरस्रोत झुळझुळ वाहायला लावले. उस्तादांनीं त्यांच्याकडून बाजारहाट व हुक्का भरून घेण्यापलीकडे कसलीच सेवा घेतली नाहीं, इतका रामभाऊंवर त्यांचा लोभ जडला. पहिलीं कांहीं वर्षें निव्वळ आवाज कमावण्यांतच गेल्यानें रामभाऊंची चिजांची कमाई बेताचीच झाली. पण अखेरच्या तीन वर्षांत मात्र प्रचलित असे सर्व राग त्यांनीं कंठगत करून घेतले. रोजचा रियाज व खांसाहेबांच्या मागें मैफलींत गायनाला साथ करणें यानें रामभाऊंना विद्येचें ग्रहण व तिचें प्रदर्शन करण्याची संधि मिळत गेली. त्यामुळें सभाधीटपणा येऊन मैफलीला खूष करण्याच्या सर्व खुब्या त्यांना साध्य झाल्या.

"खांसाहेबांसारख्या मधुर व रसिक गायकाचा माधुर्यांत बुडालेला कंठ त्यांच्या सतत कानीं पडत असल्यानें, तीच माधुरी त्यांच्या गळ्यावर व गायकीवर चढली असल्यास नवल कसलें! १९०१ ते १९०७ सालपर्यंत रामभाऊंनीं खांसाहेबांकडे सतत विद्या घेतली.

"१९०९ सालीं रामभाऊ नाट्यकलाकंपनींत दाखल झाले. उमरावतीस सौभद्र लागलें. पहिल्याच प्रयोगाला त्या काळचे पुढारी, लोकमान्यांचे स्नेही कै. दादासाहेब खापर्ड्यांसारखे रसिक व विद्वान् आमंत्रित पाहुणे म्हणून उपस्थित होते. परंतु रामभाऊंचें दुर्दैव आडवें आलें. राक्षसानें सुभद्रेला आणून ठेवण्याच्या धांदलींत सुभद्रेच्या डोक्यावरील टोप निसटून खालीं पडल्यानें प्रेक्षकांत हंशा व टाळ्यांचा कडकडाट होऊन नाटकाचा बेरंग झाला. या अपशकुनानें रामभाऊंचें दुसऱ्या व तिसऱ्या अंकांतील काम पडलें. गाणींहि जमलीं नाहींत. परंतु चौथ्या अंकांत दैवाचा फेरा अनुकूल झाला.












'असतांना यतिसंनिध' हें पद आंतून सुरू करतांच रामभाऊंचा आवाज लागला व मग काय ! हुरूप येऊन पुढील प्रत्येक गाणें बहारीनें गाऊन श्रोत्यांवर त्यांनीं आपल्या स्वरेल व मधुर गायनाची छाप पाडली. दादासाहेबांशेजारीं अनसारे म्हणून एक संगीतज्ञ वकील बसले होते. ते तर या गाण्यावर इतके खुष झाले कीं, दादासाहेबांना त्या आनंदाच्या भरांत ते म्हणून गेले : 'अहो हे तर सवाई गंधर्व आहेत !' झालें, दादासाहेबांनीं आपल्या पुढील भाषणांत हीच सार्थ पदवी रामभाऊंना बहाल केली. लोकमान्यांना बालगंधर्व भेटला तर त्यांच्या स्नेह्यांना सवाई गंधर्व ! एकाच रात्रीं दैवाचा हा विचित्र खेळ श्रोत्यांना पाहावयाला मिळाला.

" त्यांचें स्वरसौन्दर्य एवढें प्रभावी असे कीं, गातांना त्यांना पडत असलेले कष्ट श्रोते नजरेआड करीत. द्रौपदीच्या भूमिकेंतील एका पदाच्या गायनानें त्यांनीं स्वतः देहभान विसरून श्रोत्यांना इतकें मंत्रमुग्ध केलें होतें कीं, अंगावरील शालूचा गळून पडलेला पदरहि पुण्यासारख्या चोखंदळ प्रेक्षकांच्या ध्यानीं आला नाहीं ! पडदेवाल्यानें खुबीनें सावकाश पडदा पाडल्यावरच प्रेक्षकांत थोडी खळबळ उडाली. हें त्या गायनाच्या प्रभावाचें उदाहरण मी मुद्दाम देत आहे. करुण व भक्तिपर गायनांत रामभाऊंचें कौशल्य प्रकर्षानें दिसून येई.

"आसावरी, भैरव, जोगिया, भीमपलासी, भैरवी, मुलतानी, पूरिया हे त्यांचे अगदीं हातखंडे राग ! त्यांची भैरवींतली रेकॉर्ड 'लगत कलेजवा' ही अजून अजोड आहे. रामभाऊंइतका अधिकार या रागांवर फारच थोड्या महाराष्ट्रीय गायकांनीं मिळविला असेल ! सुरांत पुरेपूर मुरलेला महाराष्ट्रीय गायक रामभाऊंइतका दुसरा कोणी सांपडणें कठिण ! रसिक श्रोते व गायन यांची कदर करतांना त्यांनीं बिदागीकडे कधींच पाहिलें नाहीं ! वऱ्हाड-नागपूरकडील रसिकांनीं त्यांच्या रसील्या गायकीची कदर सढळ हातानें व कानानें केली. कै. केशवराव भोसल्यांनीं त्यांना कसोटीला लावून, तिला रामभाऊ पूर्णपणें उतरलेले पाहिल्यावर, भरजरी वस्त्रें त्यांच्या अंगावर मिरज मुक्कामीं चढविलीं होतीं. रामभाऊंनीं भीमसेन जोशी, हिराबाई बडोदेकर यांना तालीम दिली आहे. इतका सुरीला, रसीला, चतुरस्र गायक १९१० च्या पिढीमध्यें दुसरा झाला नाहीं. त्या पिढींतला हा शेवटचाच ( Last of the Barons ! ), असें म्हणणें प्राप्त आहे. त्यांच्या मृत्यूनें भारतीय संगीताची फार हानि झाली आहे."

### रेव्ह. वेरियर एल्विन यांची कामगिरी

श्री. वेरियर एल्विन यांच्या वयाला नुकतींच ५० वर्षें पुरीं झालीं. गेलीं दोन तपें ते आदिवासींची सेवा करीत आहेत. ते मोठे मानववंशशास्त्रज्ञ असून मानवसेवकहि आहेत. त्यांच्या कार्यासंबंधीं पुढील मजकूर 'साधने'-( ३०-८-५२ ) वरून सारांशानें उद्धृत केला आहे :

" वेरियर एल्विन यांचे वडिल ख्रिस्ती धर्मप्रचारक होते. पश्चिम आफ्रिकेंत जनसेवाद्वारां धर्मप्रचार करण्यासाठीं ते गेले होते. त्यांच्यापूर्वीं तेथें गेलेले धर्मप्रचारक तेथील बिकट परिस्थितीमुळें माघारीं आले, पण वेरियर यांचे वडील तेथील बिकट परिस्थितीशीं शौर्यानें सामना देत राहिले. तेथील जंगलांत ते निर्भयपणें संचार करीत. आफ्रिकेंतच त्यांचा पिवळ्या तापाच्या साथींत अंत झाला. परंतु मुलाच्या जीवनांत जंगलासंबंधीं एक प्रकारचें आकर्षण निर्माण झालें. वेरियरच्या आईचा जन्म हिंदुस्थानांत झाला होता.

" वेरियरच्या अंतःकरणाला निराळीच ओढ होती. धाडसानें व निःस्वार्थीपणानें जीवन घालवावें असें त्याला वाटत होतें. भौतिक वस्तू मिळविण्यांत खरें यश नसून मानसिक व आध्यात्मिक समाधान मिळविण्यांतच जीवनाची इतिकर्तव्यता आहे अशी त्याची खात्री झाली होती. आपल्या बांधवांनीं हिंदुस्थानची जी लयलूट केली आहे तिची थोडीफार भरपाई करावयाची तर आपण तेथील जनतेची सेवा केली पाहिजे, हीच खरी ख्रिस्तसेवा आहे, असें वेरियरच्या मनानें घेतलें. भारतीय तत्त्वज्ञान, संस्कृति यांचा त्यानें अभ्यास केला व ख्रिस्ती धर्मप्रचाराची दीक्षा घेऊन १९२७ सालीं तो हिंदुस्थानांत आला.










" खिस्ताचें तत्त्वज्ञान पसरविणें म्हणजे आपली संस्कृति विसरून लोकांनीं खिस्ती धर्माची दीक्षा घेऊन पाश्चात्त्यांचें अनुकरण करणें नव्हे, ही गोष्ट एल्विनच्या लक्षांत आली होती. धर्म व राष्ट्रीयता यांची गल्लत केल्यानें हिंदुस्थानांत खिस्ती धर्माला प्रतिष्ठा नाहीं ही गोष्ट एल्विननें हेरली.

"आपली राष्ट्रीयता कायम ठेवूनहि खिश्चन धर्म पाळतां येतो, खिस्ती धर्म स्वीकारला म्हणजे स्थानिक जनतेपेक्षां आपण कोणी वेगळें झालों, आपली मातृभूमीहि बदलली अशी भावना निर्माण होणें ही विकृति आहे, असा त्यांचा ठाम निश्चय झाला.

" गांधीजींच्या हातीं त्या काळीं भारतीय राजकारणाचीं सूत्रें आलीं होतीं. भारतीय राष्ट्राला नवमूल्यांची दीक्षा गांधीजी देत होते. सबंध राष्ट्रांत खळबळ होत होती. एल्विन यांनीं गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. सत्याग्रहाचा मार्ग हाच मानवतेला शोभणारा व खिस्ताच्या तत्त्वज्ञानाशीं सुसंगत असलेला मार्ग आहे अशी त्यांची खात्री पटली. भारतीय खिस्ती बांधवांनीं गांधीजींच्या चळवळींत भाग घेतला पाहिजे, भारतीय राष्ट्रीय चळवळीचा त्यांनीं विश्वासघात करूं नये, त्यांत समरस व्हावें, असें त्यांना वाटत असे.

" १९३० सालची चळवळ सुरू झाली. गुजरातमधील लढ्याची पाहाणी करावयासाठीं गांधीजींच्या सूचनेवरून सरदारांनीं इतरांबरोबर एल्विन यांनाहि बोलावलें. आपले गुजरातमधील अनुभव त्यांनीं 'गुजरातमधील एका निर्जन खेड्यांतून' या पुस्तकांत वर्णन केले आहेत. त्यांत सरकारच्या दडपशाहीचा त्यांनीं तीव्र निषेध केला आहे.

" आपल्यापरी ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या पापाचें प्रायश्चित्त घ्यावयाचें व खिस्ताची सेवा करावयाची तर खिस्ताला साजेशा मार्गानें चालणारी चळवळ उचलून धरली पाहिजे व दरिद्री व मागसलेल्यांच्या जीवनांत आनंद, सुख आणण्यासाठीं झटलें पाहिजे, असें त्यांच्या मनानें घेतलें. गुजरातमधील दौऱ्याच्या वेळीं त्यांनीं सरदारांजवळ आपली इच्छा बोलून दाखविली. 'गुजरातमध्यें कार्यकर्त्यांची कमतरता नाहीं, दुसरीकडे कोठें सेवाक्षेत्र शोधा' असा सरदारांनीं त्यांना सल्ला दिला. जमनालालजी बजाज यांनीं त्यांना मध्यप्रदेशांतील आदिवासींचें क्षेत्र सुचविलें व त्या भागाची पाहाणी करण्यासाठीं त्यांची सोय करून दिली. तोंपर्यंत भारतांत आदिवासी आहेत ही गोष्टहि वेरियरना ठाऊक नव्हती.

" गांधीजी पहिल्या राऊंड टेबल कॉन्फरन्सला जाऊन आले. सरकार गांधी-आयर्विन करार मोडून राष्ट्रीय चळवळीचा बीमोड करण्याला टपलें होतें. देशभर अटक, झडत्या, लाठीमार, गोळीबार यांचें सत्र सुरू झालें होतें. सरहद्द प्रांतांतल्या शूर खुदाई खिदमतगारांवर सरकारनें अमानुष अत्याचार केले होते. बाहेरच्या कोणी जाऊन तेथें चौकशी करावी तर सरकार कोणाला तेथें येऊं देत नव्हतें. तोंड दाबून बुक्क्याचा मार बसत होता. गांधीजींनीं एल्विन यांना सदरहू प्रांतांत जाऊन तपास करण्याची सूचना केली. त्यांनीं सरकारची नजर चुकवून व प्राण संकटांत घालून कोणाशींहि ओळखदेख नसतांना सरकारी दडपशाहीची पाहणी करून त्याचा वृत्तान्त प्रसिद्ध केला. वृत्तान्त अर्थातच जप्त झाला. पण सरहद्दीवरच्या शूर पठाणांवर झालेल्या अन्यायांना एल्विन यांनीं वाचा फोडली व पाश्चात्त्यांना सरहद्द गांधींच्या कार्याची पाहिली ओळख करून दिली.

" मध्यप्रदेश व उत्तर प्रदेश यांत, त्यांनीं अनेक ठिकाणीं व्याख्यानें देऊन सत्याग्रह व खादी यांचा पुरस्कार केला. परंतु राजकारण हें आपलें क्षेत्र नव्हे, भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळींत युरोपियनानें पडण्यापेक्षां त्यानें येथील गरीब जनतेची सेवा करीत राहावें, असें त्यांना वाटत होतें. याच वेळीं ते इंग्लंडमध्यें गेले असतां त्यांना राजकारणांत भाग न घेण्याच्या अटीवरच हिंदुस्थानांत परतण्याची परवानगी सरकारनें दिली. हिंदुस्थानांत आल्यावर मध्यप्रदेशांतील गोंड विभागांत करंजिया येथें त्यांनीं आश्रम काढला व तेथें ते कार्य करूं लागलें. त्याचें वर्णन त्यांनीं 'वनपर्णें' या पुस्तकांत केलें आहे.

" हिंदुस्थानांतील माणसांना खिश्चन धर्माची म्हणजे पाश्चात्त्य आचारांची दीक्षा देऊन त्यांना स्वत्वहीन करण्याचें धोरण सोडून एकादा मिशनरी

जर येथील ब्रिटिश साम्राज्यशाहीविरोधी लढ्यांत भाग घेऊं लागला तर तें ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या छत्रछायेंत काम करणाऱ्या बिशपांना कसें आवडावें ? चर्चशीं वेरियर यांचा झगडा सुरू झाला. ' राजकारणाशीं धर्मप्रचारकांना कांहीं कर्तव्य नाहीं ' या मुद्द्यावर चर्चनें त्यांना राजकारणापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. शेवटीं त्यांनीं धर्मप्रचारकाच्या पदाचा राजीनामा दिला आणि स्वतःच्या व्यक्तिगत शक्तीवरच कार्य करण्याचें ठरविलें.

" आदिवासी विभागांत काम करणें ही गोष्ट सोपी नाहीं आणि त्यांतून सरकारच्या पाठिंब्याशिवाय एखाद्या परदेशी माणसानें तें करणें हें तर अधिकच कठिण. आदिवासींचें दारिद्र्य, अज्ञान, अंधविश्वास, त्यांच्यांतील नाना रोग यांच्याशीं झगडून त्यांना सुधारणें ही आदिवासी-सेवेची सर्वसामान्य रूपरेखा आहे. त्यासाठीं शाळा, दवाखाने व प्रत्यक्ष सेवेंतून त्यांना विश्वास संपादन करणें या गोष्टी कराव्या लागतात. वेरियर एल्विन यांनीं कांहीं हिंदी सहकारी मिळविले आणि त्या सहकाऱ्यांच्या मदतीनें ह्या गोष्टी करूं लागले. ह्या सर्वांसाठीं लागणारा पैसाहि त्यांनीं आपल्या हिंदी मित्रमंडळींतून स्वतःच्या हिंमतीवर गोळा केला.

" आदिवासी व वन्य जमातींच्या लोकांची सुधारणा करावयाची म्हणजे त्यांचें जीवन बदलावयाचें व शहरी आचारविचारांची त्यांना दीक्षा द्यावयाची असें लोकांना वाटतें. असें करतांना त्यांची खास अरण्य-संस्कृति नष्ट केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें आदिवासी-सेवकांनाहि वाटतें. आदिवासींच्यामध्यें आज जें कार्य होतें त्यापैकीं बरेंचसें कार्य असें आहे कीं, त्यामुळें त्यांचें वैशिष्ट्यपूर्ण जीवनच नष्ट होतें. आपली संस्कृति कमदर्जाची असें वाटून त्यांना तिची लाज वाटूं लागते. ही वन्य जमातीची सेवा नसून तो वन्य जमातींवर अत्याचार आहे, असें एल्विन यांना वाटतें. आदिवासींची सेवा करावयाची म्हणजे त्यांना भयमुक्त करावयाचें व सावकार-जमीनदार यांच्या तावडींतून त्यांची सुटका करून त्यांना जीवनाच्या प्राथमिक गरजा सहज उपलब्ध होतील असें करावयाचें. भय आणि भूक हे आदिवासींचे मुख्य शत्रू आहेत. त्यांच्या जीवनांतील सहजता नष्ट करतां कामा नये असा त्यांचा आग्रह असतो. त्यांची भाषा, त्यांचे सण, साहित्य, नृत्य, गाणीं हीं जतन केलीं पाहिजेत असें त्यांना वाटतें. मध्यप्रदेशांतील वन्य जमातींच्या प्रदेशांत त्यांनीं याच दृष्टीनें कार्य चालविलें आहे.

" वेरियर एल्विन यांच्या जीवनाचा आणखी एक महत्त्वाचा पैलू आहे आणि तो म्हणजे त्यांनीं केलेली साहित्यसेवा. आदिवासींना बोलतें करणें हें मुक्याला बोलतें करण्याइतकेंच कठिण. पण आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनें त्यांनीं असें साहित्य जमा केलें व प्रसिद्धहि केलें. येथील राष्ट्रीय चळवळ व गांधीजींचें तत्त्वज्ञान यांचा परिचय करून देणाऱ्या त्यांच्या लिखाणापेक्षां त्यांचें हें अभ्यासपूर्ण साहित्य अधिक काल टिकणारें व महत्त्वाचें आहे. ' वनपर्णें ' या पुस्तकांत त्यांनीं करंजिया येथील जीवनाचें चित्रण केलें आहे. ' महाकोसलच्या लोककथा ', 'छत्तीसगढचीं लोकगीतें', ' ओरिसांतील वन्य जातींच्या लोककथा ', ' मध्ययुगांतील वन्य जमातींची कला ' अशीं अभ्यासपूर्ण पुस्तकें त्यांनीं तयार केलीं आहेत. ' मरिया खून व आत्महत्या ' या पुस्तकांत आदिवासी विभागांतील १०० खून व ५० आत्महत्या यांची सविस्तर चर्चा केली आहे. त्यावरून आदिवासींच्या मनोवृत्तीची माहिती मिळते. याशिवाय आदिवासींच्या जीवनाचें चित्रण करणाऱ्या कांहीं कादंबऱ्याहि त्यांनीं लिहिल्या आहेत. मानववंशशास्त्राच्या अभ्यासकांना त्यांनीं भरीव अशी सामग्री उपलब्ध करून ठेवली आहे. त्यांनीं मुख्यतः गोंडविभागांतच कार्य केलें असलें तरी भारतांतील बहुतेक प्रांतांतील आदिवासी-विभागांत ते फिरले आहेत.

" आदिवासींच्या प्रश्नांचा त्यांचा अनेक वर्षांचा अभ्यास आहे. त्यांनीं एका गोंड स्त्रीशीं विवाहदेखील केला. आदिवासींच्या जीवनाची संशोधनपूर्वक माहिती देणारे ' दि बायगा ', ' दि अगारिया ' यांसारखे मानववंशशास्त्रा-( Anthropology )-वर प्रमाणभूत मानले जाणारे ग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत. ते स्वतः मात्र नेहमीं म्हणतात : ' मी वंशशास्त्रज्ञ नाहीं, मी केवळ एक साहित्यिक व मानवप्रेमी आहे. ' सेवाकार्याला








साक्षेपी व अभ्यासू वृत्तीची जोड मिळाल्यानें वेरियर एल्विन यांचें आदिवासी सेवकांत फार वरचें स्थान आहे. "

**' दि बॉम्बे ॲसोसिएशन् 'ची शतसंवत्सरी**

' दि बॉम्बे ॲसोसिएशन् ' नांवाची संस्था २६ ऑगस्ट १८५२ या दिवशीं मुंबईला स्थापन झाली. त्या वेळीं मुंबईतील वेगवेगळ्या जमातींचे प्रतिनिधी जमलेले होते. कै. गोविंद नारायण माडगांवकर यांनीं नमूद केल्याप्रमाणें ब्रिटिश पार्लमेंटसारखी हिंदुस्थानांतील राजकीय संस्था म्हणून लोक तिच्याकडे पाहात होते. या संस्थेच्या पहिल्या अधिकारी मंडळींत श्री. जगन्नाथ शंकर शेट, सर जमशेटजी जिजीभाई, डॉ. भाऊ दाजी आणि श्री. विनायक जगन्नाथजी वगैरे प्रमुख नागरिक होते. १८८५ मध्यें स्थापन झालेल्या ' दि बॉम्बे प्रेसिडेन्सी ॲसोसिएशन'च्या आधींची आरंभाची ही संस्था होय. पहिल्या संस्थेंतील कांहीं तरुण मंडळींनींच ही संस्था पुढें स्थापली व तीच मंडळी हिंदी राष्ट्रीय सभेच्या पहिल्या अधिवेशनाची आमंत्रक मंडळी होती. या ' बॉम्बे ॲसोसिएशन्'ला नुकतींच शंभर वर्षें पुरीं झालीं. त्यानिमित्त प्रा. अ. का. प्रियोळकर या मराठीच्या प्रसिद्ध विद्वानांनीं ' भारतज्योती 'च्या १० ऑगस्टच्या अंकांत ' दि बिगिनिंग ऑफ् ऑर्गनाइझ्ड् पोलिटिकल वर्क् ' या मथळ्याखालीं माहितीपूर्ण लेख लिहिला आहे. त्यांतून पुढील मजकूर संकलित केला आहे :

"इंग्रजी अमदानीच्या सुरुवातीचीं माणसें इंग्रजी सत्तेमुळें दिपून गेलीं होतीं व त्यांना राष्ट्राभिमान राहिला नव्हता, अशी एक लोकप्रिय समजूत आहे. पण ती सर्वांशीं बरोबर नाहीं. या मंडळींना ब्रिटिश सत्तेचे गुण व दोष दिसत होते व त्यांपैकीं बाळशास्त्री जांभेकर व लोकहितवादी यांनीं तसें प्रत्यक्ष लिहिलेंहि आहे.

" १८३३ च्या ईस्ट इंडिया कंपनीच्या चार्टरमध्यें असें स्पष्ट म्हटलेलें होतें कीं, कोणाहि हिंदी माणसाला केवळ जात, धर्म व वंश या कारणानें राज्यकारभारांतील उच्च अधिकाराची जागा मिळण्यास अडचण येणार नाहीं. पण प्रत्यक्ष आचरणांत केवळ ब्रिटिशांनाच या जागा मिळत असत. तरुण बंगाली पदवीधरांनीं एक संस्था स्थापून याविरुद्ध चळवळ सुरू केली होती व तिलाच पाठिंबा देण्यासाठीं मुंबईच्या सुशिक्षित मंडळींनीं ' दि बॉम्बे ॲसोसिएशन ' स्थापिली.

" १८५२ ची वेळहि याला अनुकूल होती. कंपनीचा चार्टर पुन्हां मंजूर व्हावयाचा होता. अशा वेळीं पार्लमेंटकडे अर्ज केल्यास हिंदी लोकमताचा प्रभाव पडेल असें वाटून या संस्थेनें पहिला अर्ज त्यासाठीं केला. त्यांत असें दाखविलेलें होतें कीं, ब्रिटिश सत्तेचे जे कांहीं चांगले विशेष होते ते ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या व्यक्तिगत गुणांमुळें आढळून येत होते, राज्यकारभाराच्या पद्धतींतील चांगलेपणामुळें नव्हे. जशी जमेल तशी ही व्यवस्था अंमलांत आली होती. त्यामागें सुसूत्र योजना नव्हती. हिंदी परिस्थितीचा विचार करून घडविलेली ती पद्धत नव्हती. राज्यकारभारांत चालणारी लांचलुचपत, शोषण, बेजबाबदारपणा आणि वंशजातिभेद वगैरे दोष दूर होण्यासाठीं प्रत्यक्ष विधायक सूचनाहि या अर्जांत केलेल्या होत्या. म्हणूनच ' लीडर ' नामक ब्रिटिश वर्तमानपत्रांत त्या वेळीं या अर्जाचें वर्णन असें आलें होतें कीं, '...मुंबईची ही मंडळी गुलामी वृत्तीनें लोटांगण घालीत येथें अर्ज करीत नाहीं. तर त्यामागें एक राजकीय चळवळ अनुस्यूत झालेली आहे. लिव्हरपूल किंवा मॅन्चेस्टरच्या मध्यमवर्गीय जनतेच्यासारखीच हीहि एक राजकीय चळवळ आहे. '

" हिंदी पक्षाचें म्हणणें ब्रिटिश जनतेपुढें मांडण्यासाठीं या संस्थेचे पहिले चिटणीस डॉ. भाऊ दाजी यांनीं एक योजनाहि आंखली होती व त्याप्रमाणें खूप रकम जमवून हिंदविषयक साहित्य इंग्लंडमध्यें प्रसिद्धहि झालें होतें. या संस्थेचें दुसरें कार्य जनतेच्या फारसें लक्षांत राहिलेलें दिसत नाहीं. मुंबई विद्यापीठाची स्थापना करण्यासाठीं याच संस्थेनें सरकारकडे अर्ज पाठविला होता व त्याचा परिणाम म्हणूनच त्या विद्यापीठाची स्थापना करण्यांत आली.

" स्वातंत्र्याचे फार मोठे लढे लढविलेल्या आजकालच्या मंडळींना हें कार्य फारसें आकर्षक वाटणार नाहीं हें खरें. पण भारतीय इतिहासाच्या अभ्यासकांना या संस्थेच्या कार्याचें महत्त्व सहज पटावें. या



अनुक्रमणिका






संस्थेनें राजकीय दृष्टीची सर्वप्रथम चळवळ आपल्या-कडे सुरू केली. आतां लोकशाहीच्या स्थापनेनंतर तिची परिपूर्ति झाली आहे. अशा वेळीं, विशेषतः मुंबई राज्यानें या संस्थेची शतसंवत्सरी थाटानें साजरी करणें योग्य होईल."

## फुलपांखरांच्या जगांत

बगीचांत फुलझाडांवरून बागडणारीं फुलपांखरें पाहून आपणाला किती आनंद होतो आणि हीं नाजुक पांखरें म्हणजे निरुपद्रवीपणाचीं मूर्तिमंत उदाहरणेंच वाटूं लागतात! दुर्दैवानें हें नेहमींच खरें नसतें. निदान कांहीं प्रकारचे चतुर (moths) आणि फुलपांखरें उपद्रव करीत असतात असें आढळून आलें आहे. विशेषतः पंख फुटण्यापूर्वींची त्यांची जी अळीची अवस्था असते त्यांत तर हे प्राणी वनस्पतींचा संहारच करीत असतात.

या पतंग-चतुरांना व फुलपांखरांना शास्त्रीय नाव Lepidoptera असें आहे. हिंदुस्थानांत १२०० ते १५०० पर्यंत वेगवेगळ्या जातींच्या फुलपांखरांची मोजदाद करण्यात आली असून, त्यांचें वर्तन आणि त्यांचा जीवनविकास यांची नोंद करण्यांत आली आहे! हिंदुस्थानांत 'पुसा' येथील भारतीय शेतकी-संशोधन-संस्थेतील तज्ज्ञांनीं २००० पतंगांची तपशीलवार माहिती नोंदण्याची खटपट चालविली आहे. ह्याच तज्ज्ञांच्या देखरेखी-खालीं तेथील 'राष्ट्रीय पुसा कीटकसंग्रह' तयार झाला असून तेथें ७८० प्रकारचीं फुलपांखरें आणि ३८०० प्रकारचे पतंग-चतुर ठेविलेले आहेत.

जगांतील कीटकांच्या जाती २० लाखाहून अधिक आहेत व त्यांतील ७५,०००० जातींची शास्त्रीय पद्धतीनें यादी तयार झाली आहे. पुसा येथील कीटकसंग्रहांत १५००० जातींचे एक लाख कीटक ठेवलेले आहेत.

आजतागायत ब्राझिलमध्यें सर्वांत अधिक फुलपांखरें आहेत. ध्रुवप्रदेशांत फुलपांखरें बहुधा नसतात, पण आर्क्टिक प्रदेशांत ४६ प्रकारचीं फुलपांखरें आढळलीं आहेत. आइस्लन्डमध्यें तद्देशीय अशीं फुलपांखरें नाहींत, पण आगंतुक पाहुणे म्हणून कांहीं जाती तेथें जातात.

या कीटकांना मध फार आवडतो हें प्रसिद्धच आहे. तरीहि रुचिभेद यांतहि आहेच. रेड ॲड्मिरल नामक फुलपांखराला खराब फळें आवडतात तर पर्पल एम्परर्ला सडलेलें मांस आवडतें. कांहीं पतंगांना मोगरा वगैरे फुलांतील रस आवडतो तर कांहींना कांटेरी झुडुपांतील मधच आवडतो.

बहुतेक पतंग रात्रिंचर असतात, पण रात्रंदिवस भटकणारेहि कांहीं आहेत. फुलपांखरें मात्र साधारणतः दिवाचरच असतात. कांहीं प्रकारचे lepidoptera कीटक खूप लांब भटकतात. अमेरिकेंतील मॉनर्क फुलपांखरू असें आहे. सीलोनमधील २३० प्रकारच्या फुलपांखरांतील अधिकांश संख्या भटकी आहे. 'पेंटेड लेडी' हें फुलपांखरू उत्तर आफ्रिकेंतून दक्षिण युरोपांत वसंत ऋतूंत येतें. हीं उड्डाणें उत्तर युरोप व आइस्लॅन्डपर्यंतहि पोंचतात. फुलपांखरें समुद्राच्या आंत कोणत्याहि ज्ञात जमिनीपासून १००० मैलांवर आढळलीं आहेत.

कांहीं पतंगांच्या अळ्या लोंकरी, वस्त्रें, गालिचे आणि सुकीं कातडीं यांचा नाश करतात. कांहीं पतंग गहूं, मका, भात आणि इतर धान्यांवर धाड आणतात. एका प्रकारचे पतंग कापसाच्या रोपांचा नाश करतात. लाखेची पैदास कांहीं पतंगांमुळें फार कमी होते. डायमंड ब्लॅक पतंग भाज्यांचा नाश करतो. इंडियन मील (meal) पतंग बदाम, किराणा माल व सांठवलेलें धान्य यांना उपद्रव पोंचवितो.

फक्त थोडेच Lepidoptera कीटक माणसाला उपयोगी आहेत व त्यांतच रेशमी किड्यांचा समावेश होतो.








अनुक्रमणिका








Regd. No. B. 5177

‘ नवभारत ’ प्रकाशन : १ :

मूल्य दोन रुपये

# पंकज

[ लिन युथांग यांच्या कादंबरीचा अनुवाद ]

अनुवादिका : **प्रेमा कंटक**

•

एक विदुषी अनुवादिकेला या कादंबरीबद्दल लिहिते : “ कथा हृदयंगम आहे. नायिका वेश्या असल्याकारणानें तिची उदात्तता अधिकच हृदयाला भिडेल. तिचें पहिलें दर्शन झाल्याचें वर्णन वाचतांना महाश्वेता-पुंडरीकमीलनाचा आभास होतो. मराठी कथासाहित्यांत एका अमोलिक कथेची भर टाकलीस. ”

•

प्राप्तिस्थळ:—

( १ ) श. म. देव, प्रकाशक : ‘ नवभारत ’ प्रकाशन, २९१ शनिवार, पुणें २.

( २ ) सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, टिळकरोड, पुणें २.

अनुक्रमणिका






